


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ पुरस्कृत )

वर्ष ४०
अंक १६०
जानेवारी-मार्च
१९६७

## ले ख



: प्रकाशन
१ मे १९६७

## प री क्ष णे

सु. रा. चुनेकर, मु. ग. पानसे, अशोक केळकर
वा. रं. सुंठणकर

याशिवाय

वार्षिक इतिवृत्त व हिशेबपत्रके, सार-संकलन,
साभार स्वीकार इ.

: संपादक :
के. नारायण काळे

महाराष्ट्र–साहित्य–परिषद
टिळक-रस्ता, पुणे २

# साभार - स्वीकार

**सरस्वतीचे लाडके पुत्र** — लेखक व प्रकाशक द. मो. दामले, १४० मुरारजी पेठ, सोलापूर; १२ रु.

**निवडक एकांकिका** (१९६४) — संपादक श्री. र. भिडे, चिरंजीव ग्रंथ प्रकाशन, पुणे २; ६ रु.

**येतो, पाहतो आणि जिंकतो** (नाटक) — लेखक व प्रकाशक गो. ल. आपटे, पुणे ४; १ रु.

**श्रीमती अहिल्याबाई भांडारकर स्मृति-ग्रंथ** — संपादक कमलिनी दामले, वाडिया कॉलेज, पुणे १; ७ रु.

**केशवसुतांची काव्यदृष्टि** — दि. के. बेडेकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ५ रु.

**माझे विद्यापीठ** (कविता) — नारायण सुर्वे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ३ रु.

**विदूषक** (कविता) — मंगेश पाडगावकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ४ रु.

**समीक्षा** (नवकाव्यविषयक परिसंवाद) — पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ३ रु.

**वासनाचक्र** — टेनेसी विल्यम्स, अनुवादक विजय तेंडुलकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ३ रु.

**ज्यांचे होते प्राक्तन शापित** — यूजीन ओनील, अनुवादक सदानंद रेगे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ५ रु.

**अवंती** (कादंबरी) — शालिनी हळदीपूरकर, भारतीय ग्रंथ भवन, दादर मुंबई १४; ६ रु.

**उडती छबकडी** (वैज्ञानिक वेडकथा) — भा. रा. भागवत, भारतीय ग्रंथ भवन, मुंबई १४.

**आल्हाद** (कविता) — लेखक रा. लिं. मैंदरकर, नेहरू चौक, उस्मानाबाद; २.७५ रु.

**माती जागवील त्याला मत** — बाबा आमटे, साधना प्रकाशन, पुणे २; १ रु.

**हिंदुसमाज : संघटना आणि विघटना** — पु. ग. सहस्रबुद्धे, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे २; ६ रु.

**चित्रकंठ** — अनुवादक भानू शिरधनकर, अभिनव प्रकाशन, मुंबई १२; ३ रु.

**मस्तानीचा बाजीराव** (नाटक) — मुरलीधर जावडेकर, ४९९ शनिवार, पुणे २; ४ रु.

**बारा भाषणे** — श्री. अ. डांगे, अभिनव प्रकाशन मुंबई १२; ५ रु.

**परमहंस सभा व तिचे अध्यक्ष रामचंद्र बाळकृष्ण** — अ. का. प्रियोळकर, मुं. म. ग्रंथसंग्रहालय, मुंबई १४; ४ रु.

**शिक्षण, शील व संस्कार** — (गुरुशिष्यसंवाद) — संकलक ग. श्री. खेर, अ. वि. गृह प्रकाशन, पुणे १; ६ रु.

**मोहाचं फूल** (कथा) — सौ. सुलोचना लिमये, व्हीनस बुक स्टॉल, पुणे २; २॥ रु.

**सह्याद्रीची शिखरे** (खंड २) — अ. ह. लिमये, व्हीनस बुक स्टॉल, पुणे २; २॥ रु.

**एक हट्टी मुलगी** (नाटक) — विजय तेंडुलकर, मौज प्रकाशन, मुंबई ४; ३॥ रु.

**आभाळ वाटा** (कविता) — शंकर रामाणी, मौज प्रकाशन, मुंबई ४; ४ रु.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य पत्रिका

[ महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ पुरस्कृत ]

वर्ष ४० ✻ अंक १६० ✻ १९६७

# संपादकीय

## ४७ वे मराठी साहित्य संमेलन

भोपाळ येथे, ता. १२, १३, १४ मे १९६७ रोजी भरणाऱ्या मराठी साहित्य संमेलनाच्या अधिवेशनाच्या अध्यक्षस्थानी, नागपूर विद्यापीठाचे कुलगुरु डॉ. वि. भि. कोलते यांची योजना झाली, ही स्पृहणीय घटना होय. ते पद आणि डॉ. कोलते यांच्यामध्ये, 'साधारणो भूषण-भूष्यभावः' असा योग आहे. यामुळे डॉ. कोलते व संमेलनाचे संयोजक या उभयतांचेही या निमित्ताने हार्दिक अभिनंदन करणे युक्त होय.

डॉ. कोलते यांची शिक्षण आणि साहित्यक्षेत्रातील कामगिरी मतभेदातीत आहे. प्रतिष्ठित-प्रज्ञ पंडित आणि कर्तव्यदक्ष अधिकारी या दोन्ही दृष्टींनी त्यांची योग्यता जितकी सुपरिचित तितकीच सर्वमान्य असल्यामुळे, तिचा विस्ताराने प्रपंच करून ती पटवून देण्याचा प्रयत्न करणे जसे अप्रस्तुत तसेच अप्रयोजकपणाचेही ठरण्याचा संभव असल्यामुळे, त्या फंदात मी पडत नाही.

मराठी साहित्य संमेलनाचे अधिवेशन ही साहित्यिक व वाचक यांच्या दृष्टीने एक बहुमोल पर्वणी असते. त्या निमित्ताने दूरदूरचे साहित्यिक मोठ्या संख्येने एकत्र येतात. जिव्हाळ्याच्या साहित्यविषयक प्रश्नांवर तेथे चर्चा, ऊहापोह होतो. निदान व्हावा; अशी अपेक्षा असते. या दृष्टीने संमेलनात काय घडावे या संबंधीच्या अनेक कल्पना ठिकठिकाणाहून व्यक्त होत असतात. पत्रिकेच्या या संपादकीयातही तशा काही सूचनांचा अंतर्भाव करावा असा माझाही मानस होता; परंतु ते काम मला करता आले असते त्याहून कितीतरी अधिक अधिकारी भूमिके-वरून आणि प्रभावी पद्धतीने, नागपूरच्या तरुण भारत दैनिकाच्या ता. २-४-६७ च्या साप्ताहिक आवृत्तीच्या अग्रलेखात झालेले असल्याचे मला दिसून आले. यामुळे माझा पहिला बेत बदलून तोच लेख पत्रिकेत साभार उद्धृत करण्याचा सोपा मार्ग चोखाळण्याचे मी ठरविले. 'सारसंकलन' या सदरात तो आढळेल.

### अभिनंदन

"शतायुर्वै पुरुषः" अशी श्रुती आहे. वर्तमान जीवनक्रमात मात्र तिचा क्वचितच दाखला मिळतो. महर्षी अण्णासाहेब कर्वे ही एक तशी महनीय विभूती महाराष्ट्रात होऊन गेली. या वयोमर्यादेच्या चार-दोन वर्षे आगेमागे असलेल्या काही व्यक्ती आजही दृष्टीसमोर दिसतात. वेद-वाचस्पती पंडित सातवळेकर हे त्यांतील अग्रगण्य होत. श्रद्धा, स्वाध्याय, साधना आणि शुचिता, यांच्या द्वारा पंडितजींनी ही सिद्धी मिळविली. निःस्पृह वृत्तीने जीवन व्यतीत केले. 'कृण्वन्तो विश्वमार्यम्' या धारणेने आपले कार्यक्षेत्र सफल-सुफल केले.

अशा पुरुषाचा समाजाने सत्कार करणे हे त्याचे कर्तव्यच होय. त्याने त्या व्यक्तीच्या सन्मानापेक्षा तो करणाऱ्यांनाच अधिक प्रेरणा लाभ होत असतो. पुणे मराठी ग्रंथालयाने पंडितजींचा सत्कार करण्याचे ठरविले ही प्रशंसनीय गोष्ट आहे.

या निमित्ताने पंडितजींबद्दलचा पत्रिकेचा व परिषदेचा आदर व्यक्त करण्याची संधी लाभली, हे मी आमचे भाग्य समजतो. पंडितजींना, माणसाच्या आयुर्मर्यादेबद्दलच्या त्यांच्या कल्पनेनुसार, दीर्घायुरारोग्य लाभो ही सदिच्छा.

### आभार

प्रस्तुत १६० व्या अंकाच्या प्रकाशनाने परिषदेच्या १९६४-६७ या कालखंडातील कार्यकारी मंडळाने नियुक्त केलेल्या संपादकाच्या अधिकाराची मुदत संपुष्टात येत आहे. याकरिता या अवधीत ज्यांनी लेखनसाहाय्य करून, वा अन्य रीतीने, पत्रिकेला प्रतिष्ठाप्राप्ती करून देण्याच्या कामी मला मदत दिली त्या सर्वांचे मी कृतज्ञतापूर्वक आभार मानतो.

या वेळी पत्रिकेचे संपादकपद माझ्याकडे आले हा केवळ योगायोग होय. कार्याध्यक्षपदाचा स्वीकार केल्या-

अनुक्रमणिका

नंतर, मी माझे स्नेही प्रा. क्षीरसागर यांना त्यांनी पत्रिकेचे संपादन करावे अशी आग्रहाने गळ घातली, आणि कामाचा फार मोठा व्याप मागे असताही, त्यांनी माझ्या आणि कार्यकारी मंडळाच्या विनंतीला मान देऊन ती स्वीकारली. संपादकीय स्फुटे लिहिण्याव्यतिरिक्त पत्रिकेच्या इतर कामाचा व्याप आपण अंगावर घेणार नाही, हे त्यांनी त्याच वेळी स्पष्ट केले होते, व त्याला मी मान्यताही दिली होती. परंतु पुढे तेवढीही जबाबदारी नको म्हणून त्यांनी संपादकपदाचा राजीनामा दिला. १९४० व १९४६ अशा दोन वेळा या पूर्वी मी पत्रिकेचे संपादन केले असल्यामुळे, या तिसऱ्या वेळीही कार्याध्यक्ष पदाबरोबर मीच ते करावे असा कार्यकारी मंडळाने एकमताने निर्णय घेतला, व त्यामुळेच मला ही जबाबदारी पत्करावी लागली.

संपादकपदाचे त्यागपत्र देऊन प्रा. क्षीरसागर हे संपादकीय जबाबदारीतून मोकळे झाले तरीही, त्यांनी पत्रिकेशी असहकार न पुकारता लेखनसाहाय्य देऊन व अन्य रीतीनेही पत्रिकेच्या संपादनाच्या कामी मला जी बहुमोल मदत केली, तिचा निर्देश करून तीबद्दल त्यांचे आभार मानणे, हे माझे कर्तव्य होय.

या तीन वर्षांत लेख, परीक्षणे, वार्षिक समालोचने, टिपणे इत्यादींच्या द्वारा लेखनसाहाय्य करून पत्रिकेला समृद्ध करण्यास ज्यांनी मला मदत केली त्या सर्वांचाच मी ऋणी आहे. परिषदेच्या साहित्यचर्चा मंडळाच्या मासिक बैठकीत वाचलेली बरीच टिपणे लेखरूपाने पत्रिकेत अवतरलेली दिसतील. १९४० साली पत्रिकेचे संपादन करण्याचे काम मी प्रथम पत्करले तेव्हा पत्रिकेत येणाऱ्या काही लेखांत तरी एकसूत्रता असावी; व त्यांच्या संकलित स्वरूपात त्यांमधून ग्रंथनिष्पत्ती फलित व्हावी; असा हेतू मी दृष्टीपुढे ठेवला होता. त्याप्रमाणे प्रा. गं. बा. सरदार. यांचा '.मराठीचे उपेक्षित मानकरी ' हा ग्रंथ, प्राचार्य रा. भि. जोशी यांनी केलेला मर्ढेकरांच्या ' आर्टस् अँड मॅन'चा अनुवाद; आणि श्री. शरच्चंद्र गुण्ये यांचे 'रुपेरी पडद्यावर' हे चित्रपटतंत्रावरील पुस्तक; असे तीन ग्रंथ पत्रिकेतील तेव्हाच्या लेखांतून सिद्ध झाले. याही वेळी तीच प्रथा पुढे चालू राखण्याची कल्पना माझ्या नजरेसमोर होती. तिला अनुसरून विद्वद्वर्य प्रा. श्री. ना. बनहट्टी यांचे गो. ब. देवल यांच्या अनुवादित नाटकांसंबंधीचे विस्तृत लेख पत्रिकेत प्रसिद्ध करण्यात आले. त्या लेखांतून मूलगामी दृष्टीचा एक बहुमोल ग्रंथ सिद्ध व्हावा अशी अपेक्षा आहे. प्रा. बनहट्टी हे चतुरस्र पंडित आणि रसिक विमर्शक असल्यामुळे, त्यांनी अत्यंत साक्षेपी दृष्टीने, अभ्यासपूर्वक लिहिलेले हे लेख पत्रिकेच्या द्वारा प्रसिद्ध होणे हे पत्रिकेला भूषण होते. ते प्रसिद्ध करण्याची अनुज्ञा आणि संधी मला दिल्याबद्दल प्रा. बनहट्टी यांचे मी मनःपूर्वक आभार मानतो.

पत्रिकेला लेखनसाहाय्य करणारे सर्व लेखक व त्यांचे सर्व लेख संपादकाच्या दृष्टीने सारखेच महत्त्वाचे असले, तरी परिमाणाच्या अपेक्षेने ज्यांचे विशेष साहाय्य झाले, अशा साहायक विद्वानांतून, श्री. देवीसिंग चौहान, अ. का. प्रियोळकर, अ. ज. करंदीकर, विनायकराव करमळकर, वि. मो. केळकर-अरविंद मंगरूळकर; रा. चिं. ढेरे, अशोक केळकर, दि. के. बेडेकर, दि. वि. काळे, श्री. रा. टिकेकर इत्यादींच्या नावांचा मी आवर्जून उल्लेख केला, तर ते गैर ठरणार नाही, अशी आशा आहे.

परिषदेच्या वार्षिक अर्थसंकल्पात, पत्रिकेचे प्रकाशन, हे कोषाध्यक्षांच्या डोकेदुखीला कारण होणारे कायमचे व्यस्त त्रैराशिक आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति-मंडळाने मदतीचा हात पुढे केला म्हणूनच या तीन वर्षांत ते काहीशा समाधानकारक रीतीने सुरू शकले. प्रथम बेचाळीसशे (४२००।-) रुपये आणि पुढच्या वर्षी पाच हजार (५०००।-) रुपये अनुदान मंडळाकडून मिळाले म्हणूनच पत्रिका, या तीन वर्षांत ज्या स्वरूपात दिसली त्या स्वरूपात प्रकट होऊ शकली. या आर्थिक पुरस्काराबद्दल पत्रिका मंडळाची ऋणी आहे. 'पात्र व्हा आणि अपेक्षा करा' ('deserve and desire'); हा शासकीय पुरस्कारांच्या संबंधातला अलिखित दंडक असतो. त्याला अनुसरून पत्रिका आपली पुरस्कारार्हता याही पुढे अधिकाधिक प्रमाणात सिद्ध करीत राहील, आणि मंडळाकडून तिच्या प्रयत्नाचे यथायोग्य प्रमाणात चीज होईल, असा विश्वास वाटतो.

शेवटी, संपादकीय जबाबदारी पार पाडीत असता, माझ्याकडून कोणाच्या बाबतीत कळत न कळत, काही उणेअधिक घडले असेल तर त्याबद्दल प्रांजलपणे क्षमायाचना करून रजा घेतो.

के. नारायण काळे

अनुक्रमणिका

# मराठी महाकोशाची योजना

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळाकडून 'महाकोशा'च्या योजनेसंबंधी परिषदेकडे पत्र आले होते. त्या पत्राला अनुलक्षून परिषदेने काही भाषातज्ज्ञांकडून अभिप्राय मागविले होते. प्रस्तुत टिपण हा त्यांपैकी एक अभिप्राय आहे. —संपादक

• अशोक रा. केळकर •

एक प्रचंड धरण बांधावे, वीजपुरवठा आणि पाणीपुरवठा ही दोन्ही अंगे त्याला असावीत का अनेक लहान लहान, कमी खर्चाची, त्वरित फायदा देणारी धरणे बांधावीत असा एक वाद आपल्याकडे हल्ली चाललेला दिसून येतो. मराठी कोशाच्या बाबतीत थोडा असाच प्रकार आहे. मोठी योजना हाती घेताना त्याची पूर्वतयारी काळजीपूर्वक आणि दीर्घकालपर्यंत करावी लागते, त्याची सामग्री उपलब्ध आहे की नाही ह्याची शहानिशा करून घ्यावी लागते, एकदा योजना निश्चित झाल्यावर नंतर प्रयोग आणि अनुभव ह्यांच्या अनुरोधाने फेरफार करीत बसणे त्यात शक्य नसते, इत्यादी मुद्दे सहज ध्यानात येण्यासारखे आहेत. अशा मोठ्या योजनांच्या कार्यवाहीबद्दलचा आपल्याकडील अनुभव सगळाच उत्साहजनक आहे असे म्हणता येत नाही. एका मोठ्या कोशाची भव्यदिव्य वाटणारी योजना हातो घ्यायला अजून अनुकूल काल आलेला नाही, त्याऐवजी अनेक लहान कोशांच्या योजना आखून त्या निरनिराळ्या संस्थांच्या सहकार्याने पुऱ्या कराव्यात, मात्र अशा योजना एका सुसूत्र मोठ्या योजनेचा भाग म्हणूनच राबवाव्यात असे ह्या बाबतीत प्रस्तुत अभ्यासकाचे स्पष्ट मत आहे. अशी सुसूत्र योजना कोणत्या स्वरूपाची असेल आणि भावी काळात महाकोश सिद्ध करण्याच्या दृष्टीने ती कशी उपकारक ठरेल ह्याचे थोडक्यात दिग्दर्शन ह्या टिपणात केलेले आहे. पण तत्पूर्वी ह्या लहान कोशांच्या योजनेचे अंतिम दूरचे ध्येय जो संभाव्य महाकोश त्याचे स्वरूप निश्चित करणे जरूर आहे.

## 'मराठी महाकोश' तयार करायचा म्हणजे काय करायचे ?

महाकोश म्हणजे समावेशक कोश—ज्यात स्थलाभावी माहिती गाळावी लागली वा तिचा संक्षेप करावा लागला ह्या विचाराला जागा नसते, आणि जो बहुशः अनेक खंडांत बांधावा लागतो. ( बहुशः म्हणण्याचे कारण मेरियम–वेब्स्टरच्या 'न्यू इंटरनॅशनल डिक्शनरी' सारखे कोशछपाईचे प्रगत तंत्र आणि उत्तम, चिवट, पातळ, पण अपारदर्शक कागद ह्यांच्या जोरावर एक खंडातही प्रसिद्ध झालेले आहेत. ) मराठीमध्ये मराठी–मराठी समावेशक कोश म्हणजे दाते आणि कर्वे ह्यांचा 'महाराष्ट्र शब्दकोश'—त्याची आठवण ह्या संदर्भात व्हावी हे साहजिकच आहे. समावेशक कोश म्हणजे दिसेल त्याचा समावेश करणारा कोश नव्हे. समावेश कशाचा करायचा ह्याबद्दल निश्चित सूत्र हवे. जे बसत नाही ते दूर सारण्याचा निग्रह हवा. 'महाराष्ट्र शब्दकोश' बारकाईने वाचून पाहिल्यावर प्रस्तुत अभ्यासकाला असे दिसून आले की, मुख्यतः मोल्स्वर्थच्या मराठी–इंग्लिश कोशाचाच तो अनुवाद आहे, अधूनमधून दुरुस्ती आणि भर दिसते हे खरे असले तरी मुळापासून पुनर्विचार आणि फारसे नवे संकलन त्यात नाही. इत्यर्थ हाच की 'महाराष्ट्र शब्दकोशा'चे ऐतिहासिक कार्य अवश्य मान्य करावे, पण त्याची सुधारून आवृत्ती काढण्यात अर्थ नाही.

नव्याने रचना करायची तर आपल्या डोळ्यासमोर असलेले काही पर्याय म्हणजे हे—एक 'न्यू इंग्लिश डिक्शनरी' ( जिला पुढे 'ऑक्सफर्ड इंग्लिश डिक्शनरी' हे अभिधान मिळाले ) ज्यात एकेक शब्दाचा रूप आणि अर्थ ह्या अंगाने इतिहास-अनेक अवतरणांच्या साहाय्याने उलगडून दाखवला आहे. दुसरा अमेरिकेतील मेरियम–वेब्स्टर वा फ्रान्समधील लारूस ह्यांनी दर्शविलेला मार्ग—ज्ञानकोश आणि शब्दकोश ह्यांमधील सीमारेषा येथे धूसर होते, ऐतिहासिक विकासापेक्षा अद्ययावतपणाकडे जास्त लक्ष दिलेले असते, आणि शब्दांची संख्या जास्तीत जास्त करण्याकडे लक्ष असते. ह्या सर्वच महाकोशांतून काहीसे दुर्लक्षिलेले अंग म्हणजे व्याकरण आणि प्रयोग ह्यांमधील बारकावे—मराठी उदाहरणे द्यायची तर 'बिलकूल' शब्द नकारार्थी वाक्यातच येतो किंवा 'मला त्या पुस्तकाला दोन रुपये किंमत पडली' ह्यासारख्या वाक्यांतून 'पडणे' क्रियापदाची विशिष्ट व्याकरणिक व्यवस्था दिसते ह्यासारख्या

अनुक्रमणिका

नोंदी महाकोशात व्हायला हव्यात. 'कन्साइज ऑक्सफर्ड डिक्शनरी' किंवा पामरचा 'अ ग्रामर ऑव्ह इंग्लिश वर्ड्स्' ह्यांसारखे काही लघुकोशच ह्या बाबतीत पुढे आहेत. ह्या सर्वांहून थोडा वेगळा पर्याय म्हणजे कोणत्याही एका पाश्चात्त्य कोशाचे अनुकरण करीत न बसता निरनिराळ्या पद्धतींमधील ग्राह्यांश निवडून आणि आपल्या विशिष्ट गरजा लक्षात घेऊन काही नवी रचना करणे.

अशी रचना करायला--मग ती नव्याने केलेली असो वा एक पाश्चात्त्य कोशाचे अनुकरण असो--जी पूर्वतयारी हवी ती आपल्याकडे अजून नाही. मुख्य म्हणजे मराठी साहित्यामधील प्रमुख ग्रंथांच्या प्रमाण आवृत्त्या नाहीत. विष्णुशास्त्री चिपळूणकरांसारख्या आधुनिक आणि महत्त्वाच्या लेखकाच्या ग्रंथांचीही ह्याबाबतीत किती दुःस्थिती आहे हे प्रा. वनहट्टी ह्यांनी परवाच एका टिपणात आपल्या निदर्शनास आणले आहे. निरनिराळ्या बोलींच्या विज्ञानशुद्ध अभ्यासाला आता कुठे सुरुवात होत आहे. आंध्रप्रदेश साहित्य अकादमीने नुकताच 'मांडलिक व्यवसाय वृत्ति-पद-कोशमु' काढला. त्यात आंध्रप्रदेशाच्या निरनिराळ्या जिल्ह्यांतून शेतीची अवजारे, पिके, शेतीच्या क्रिया आदी गोष्टींना उद्देशून कोणते शब्द वापरले जातात ह्याची नोंद केली आहे. (तेलगूमध्ये वृत्ती म्हणजे व्यवसाय आणि व्यवसाय म्हणजे शेतीचा व्यवसाय.) इतर व्यवसायांबद्दल असेच इतर कोश काढण्याचा त्यांचा विचार आहे. आपल्याकडे अजून तसे काही झालेले नाही. ही न झालेल्या तयारीची यादी आणखी बरीच वाढवता येईल हे उघड आहे.

## पूरक खंडकोशांची योजना

ह्या परिस्थितीत वास्तवस्पर्शी मार्ग म्हणजे एका महाकोशासाठी मोठा पूर्वतयारीचा पसारा न घालता अनेक खंडकोश प्रसिद्ध करणे. ह्यामुळे कार्य विकेंद्रित राहील, जरुरीपुरतेच एकसूत्रीकरण करण्यात येईल. प्रसिद्ध झालेले खंडकोश किमतीच्या दृष्टीने संबंधित अभ्यासकांच्या आटोक्यात राहतील. संपूर्ण महाकोश भावी काळात हाती घेण्यापूर्वी खंडकोशांच्यावर साधकबाधक भरपूर चर्चा होईल. पूर्वतयारीचे कार्य दीर्घकाळ पडद्यामागे चालण्यात मोठे दोष राहून जाण्याचा जो धोका असतो तो टळेल, खर्च केलेल्या पैशाचा त्वरित आणि दूरवरचा असा दोन्ही दृष्टीने पूर्ण उपयोग होईल.

संपूर्ण योजना देण्याचा येथे हेतू नाही. नमुन्यादाखल अशा काही खंडकोशांची यादी करता येईल.

(१) निरनिराळ्या प्रादेशिक बोलींच्यावर प्रबंध वा निबंध उपलब्ध आहेत. त्यांच्या अनुरोधाने निरनिराळ्या बोलींचे कोश.

(२) निरनिराळ्या कालखंडांच्यावर वा ग्रंथकारांवर भाषेच्या दृष्टीने प्रबंध वा निबंध उपलब्ध आहेत त्यांच्या अनुरोधाने कोश.

(३) एकेका विषयाचे कोश -- उदा० प्राणिनामे, वनस्पतिनामे, राग-ताल-नामे, इ०

(४) एकेका व्यवसायाचा कोश -- ज्यामध्ये रूढ परिभाषा (उदा० निंदणी), नव्याने रूढ होऊ पाहणारी परिभाषा (उदा० ट्रॅक्टर, सघन शेती), आणि नव्याने घडवलेली पण अजून कोशगतच राहिलेली परिभाषा (उदा० नलकूप) ह्या सर्वांचा वेगवेगळा निर्देश होईल.

## महाराष्ट्र-साहित्य-परिषदेला कोणता वाटा उचलता येईल ?

परिषदेचे अनेक खंडात्मक साहित्येतिहासाचे कार्य चालू आहे. त्या निमित्ताने सर्व ग्रंथांचे अवलोकन अनायासे होत आहे. समजा, क्ष हा अभ्यासक अमुक शतकातील अमुक काव्यप्रकारावर प्रकरण लिहीत आहे त्याच्या मदतीला संशोधन-सहायक आणि लेखनिक दिल्यास त्या प्रकरणापुरता एक कामचलाऊ लघुकोश निघू शकेल. साहित्येतिहासाच्या विशिष्ट खंडाला समांतर असा खंडकोश अशा लघुकोशांच्या एकत्रीकरणाने निघू शकेल. 'कामचलाऊ' म्हणण्याचे कारण प्रमाण आवृत्त्या उपलब्ध नसल्याने म्हणा, तो प्रारंभीचा प्रयत्न असल्यामुळे म्हणा, निश्चित कोशकार्याची शिस्त लागली नसल्यामुळे म्हणा, त्यात दोष राहून जाण्याचा संभव आहे. यातून काही लघुकोश तुलनेने निर्दोष निघतील. त्यांचे अनुकरण करून बाकीच्या कोशांत सुधारणा होईल. ह्या खंडकोशकर्त्यांनी आपल्याला आलेला अनुभव आणि सुचलेल्या कल्पना नमूद करणारा एक निबंधही सादर करावा. ह्या निबंधाच्या शिदोरीतून भावी महाकोशाची निर्दोष योजना सिद्ध होऊ शकेल. महाकोशाच्याऐवजी असे लहान खंडकोश तयार करण्यात प्रस्तुत टिपणकाराला दुसरा असा ठळक फायदा दिसतो की, ह्यातून कार्यक्षम कोशकर्त्यांची तरुण पिढी निवडून घेता येईल. कोश कशाशी खातात ह्याची पूर्ण जाणीव उत्पन्न होईल. साहित्येतिहासाचे कार्य आणि हे खंडकोशांचे कार्य ह्या दोहोंची सांगड घातल्यामुळे दोन्ही कार्यांना गती येईल.

साहित्य-संस्कृतिमंडळाने सुचविलेली महाकोशाची योजना मात्र सध्या हाती घेऊ नये आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेने ह्या अव्यवहार्य योजनेत सहभागी होऊ नये असे प्रस्तुत अभ्यासकाचे मत आहे. (हे मत त्याने वैयक्तिक जबाबदारीवर व्यक्त केले आहे. डेक्कन कॉलेज आणि पुणे विद्यापीठ ह्या संस्थांचे ते अधिकृत मत आहे असे ह्या टिपणावरून कोणी समजू नये.)

•••

# लोकहितवादींचे व्यक्तिमत्त्व

द. भि. कुळकर्णी

गोपाळ हरी देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांचे घराणे मूळचे रत्नागिरी जिल्ह्यातील पावस या गावचे. गोपाळरावांचे निपणजे कोकणात दहा-बारा गावची देशमुखी करीत असत. तेव्हापासूनच 'देशमुख' हे आडनाव प्रचारात आले असावे. त्यापूर्वी या कुळाचे नाव 'सिद्धये' असे होते.

गोपाळरावांचे वडील हरिपंत देशमुख हे बापू गोखले यांचे फडणीस होते. आपला राज्यकारभार इंग्रजांकडे सोपवून रावबाजीने ब्रह्मावर्ताची वाट धरली तेव्हा पेशव्यांचे वकील म्हणून हरिपंत पुण्यातच राहिले. हरिपंतांची स्वामिभक्ती उत्कट होती. एल्फिन्स्टनसाहेबाने पेशवाई बुडविली ही गोष्ट ते जन्मभर विसरले नाहीत. एल्फिन्स्टनची स्वारी कधी आपल्या वाड्याकरून गेली तर त्याचे तोंड पाहणे नको म्हणून ते खिडकीकडे पाठ करून बसत.

पेशव्यांच्या पक्षातील सर्व हुद्देदार मंडळींनी दोन महिन्यांच्या आत आपणांस येऊन भेटावे, आणि नव्या सरकारशी एकनिष्ठ राहण्याची ग्वाही द्यावी, अशा अर्थाचा जाहीरनामा एल्फिन्स्टनने पुणे काबीज केल्याबरोबर काढला. या सुमारास हरिपंत देशमुख पेशव्यांच्या देशोधडीला लागलेल्या सेनेबरोबर हिंडत होते. या कारणाने असेल, हरिपंत देशमुख ठराविक मुदतीत एल्फिन्स्टनच्या भेटीला जाऊ शकले नाहीत. त्यामुळे सरकारचा त्यांच्यावर रोष होऊन वार्षिक दहा हजार रुपये उत्पन्न असलेली त्यांची तीन गावांची जहागीर जप्त झाली.

पुढे खुद्द पेशव्यांनीच एल्फिन्स्टनसाहेबाकडे रदबदली केल्यामुळे मागील बाकीच्या भरपाईसह १८२४ साली हरिपंतांना त्यांचा सरंजाम परत मिळाला.

१८३६ साली त्यांचे देहावसान झाले आणि पुन्हा देशमुख घराण्याची जहागीर सरकारने जप्त केली. या वेळीही पेशव्यांनी थेट विलायतेपर्यंत खटपट केली. परंतु त्यांच्या प्रयत्नांना समाधानकारक यश आले नाही; जहागीर गेली ती गेलीच. इंग्रज सरकारने देशमुख कुटुंबास एक सवलत मात्र दिली : हरिपंतांच्या पत्नीस सहाशे रुपये व त्यांच्या तीनही मुलांस, सरकारी नोकरी लागेपर्यंत, प्रत्येकी दोनशे रुपये वर्षासन देण्याचे कंपनी सरकारने मान्य केले.

गोपाळरावांचा जन्म १८ फेब्रुवारी १८२३ चा. त्या काळाला अनुसरून गोपाळरावांना हिशेब, अक्षरओळख हे प्राथमिक शिक्षण घरीच मिळाले.

बालमित्रांच्या भांडणात कोणताही एक पक्ष घेण्याऐवजी स्वतःकडे न्यायाधीशाची भूमिका घेऊन सवंगड्यांची भांडणे सोडविण्याकडे लहानग्या गोपाळाचा कल असे.

बालपणापासून गोपाळरावांना अर्थशून्य मंत्रपठनाचा तिटकारा. एकदा त्यांनी गुरुजींना कुठल्याशा संस्कृत मंत्राचा अर्थ विचारला. त्या 'बोलक्या राघू' ला तो अर्थातच सांगता आला नाही. अशा प्रसंगाने हा तिटकारा अधिकच वाढला असावा.

मर्दानी खेळांतही गोपाळराव तरबेज होते. इतिहासप्रसिद्ध घराण्यात जन्म आणि दणकट अंगकाठी या कारणांमुळे घोड्यावर बसणे, पोहणे, निशाणबाजी या विषयांत ते निपुण होते. होतकरू इंग्रज सोजिरांना न साधणारी नेमबाजी करून एकदा त्यांनी एका इंग्रज अधिकाऱ्याला चकित केले. 'मराठ्यांचे राज्य नामर्दपणामुळे गेले नसून ऐक्याच्या अभावामुळे गेले' हे त्याप्रसंगी त्यांनी काढलेले उद्‌गारही त्यांच्या निर्भिडपणाचे द्योतक ठरावेत.

लग्नाच्या वेळी गोपाळरावांचे वय सात वर्षांचे व त्यांच्या पत्नीचे वय चार वर्षांचे होते. त्यांची पत्नी म्हणजे पुण्याचे दाजीसाहेब गोळे इनामदार यांची कन्या.

१८४१ साली गोपाळराव पुण्याच्या सरकारी इंग्रजी शाळेत दाखल झाले, आणि १८४४ साली त्यांचा तेथील शिक्षणक्रम पूर्ण झाला. गोपाळरावांच्या प्रगतीवर खूष होऊन शाळेचे मुख्याध्यापक डी. ए. एस्डेल यांनी गोपाळरावांना एक भरघोस प्रशस्तिपत्रही दिले. एज्युकेशन बोर्डानेही त्यांच्या आंग्ल भाषा प्रावीण्याचे कौतुक केले. इंग्रजी व इतिहास हे त्यांचे आवडते विषय होते. गोपाळरावांना आपली इंग्रजी बुके घेऊन विहिरीच्या कोनाड्यात अभ्यास करावा लागे, 'आउल म्हणजे घुबड,' 'फेदर म्हणजे

पीस' अशा पाठांतरासही त्या काळी घरी, संध्याकाळी मनाई असे. म्हणून हा आडमार्ग.

१८४४ साली मासिक ७७ रुपये पगारावर गोपाळरावांनी राजसेवेला प्रारंभ केला. लवकरच आपल्या अंगच्या गुणांनी ते अव्वल कारकून झाले. स्कूल बोर्डाच्या परीक्षेनंतर दोन वर्षांनी त्यांनी मुन्सफीची परीक्षा दिली; व सन १८५२ मध्ये वाई येथे त्यांची मुन्सफ म्हणून नेमणूक झाली. १८५५ मध्ये ते इनाम कमिशनर झाले. इनाम खाते लाचलुचपतीकरिता कुप्रसिद्ध आणि दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत इनामाच्याबाबत अनागोंदी कारभार. त्यामुळे इनाम कमिशनवर वेगवेगळ्या गोटांतून प्रखर टीका झाली. त्यातून गोपाळरावही सुटले नाहीत. १८६१ साली इनाम कमिशनचे काम संपले; व एक वर्षासाठी गोपाळरावांकडे मुंबई हायकोर्टात हिंदु-मुस्लीम धर्मशास्त्राचा गोषवारा करण्याचे काम आले. १८६२ मध्ये केवळ सनदी नोकरांकरिता असलेल्या असिस्टंट जज्जाच्या जागेवर अहमदाबाद येथे गोपाळरावांची नियुक्ती झाली. १८६३ साली सनदी नोकरांसाठी असलेली विभागीय परीक्षा ते उत्तीर्ण झाले. परंतु पुढे युरोपीय अधिकाऱ्यांनी तक्रार केल्यामुळे त्यांना आपल्या सनदीपदास मुकावे लागले. १८७६ मध्ये त्यांना नाशिक येथे पुन्हा सनदीपद प्राप्त झाले. नोकरीच्या निमित्ताने गोपाळरावांना ठाणे, अलिबाग, मुंबई, अहमदाबाद इत्यादी गावी जावे लागले.

१८७६ साली दिल्ली दरबाराच्या प्रसंगी त्यांना 'रावबहादूर' हा किताब मिळाला. दिल्लीहून परत आल्यावर 'जॉईंट जज्ज' म्हणून त्यांची नेमणूक झाली. १८७७ मध्ये 'जस्टिस ऑफ दि पीस' हा बहुमान त्यांना लाभला. पुढील वर्षी मुंबई विद्यापीठाचे फेलो म्हणून त्यांची नियुक्ती झाली. १८७८ साली वयाला ५५ वर्षे पूर्ण झाल्याने ते सेवानिवृत्त झाले. १८८० मध्ये त्यांची मुंबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे सभासद म्हणून नेमणूक झाली आणि १८८१ पासून प्रथम श्रेणीच्या सरदारांत त्यांची गणना होऊ लागली. १८८४ साली रतलाम संस्थानाची दिवाणगिरीही त्यांनी भूषविली. सेवानिवृत्त झाल्यावर सरकारने त्यांना ५००० रुपये वर्षासन मंजूर केले; व त्याला जुन्या २०० रुपये वर्षासनाची जोड दिली.

विजयादशमीच्या दिवशी घोड्याकरून सीमोल्लंघनास गेले असता गोपाळरावांना ताप आला आणि सन १८९२ च्या ऑक्टोबर महिन्यात ९ तारखेला त्यांनी आपली इहलोकीची यात्रा संपविली. "या वयोवृद्ध गृहस्थाचे नाव ज्यास ऐकूनही माहीत नसेल असा गृहस्थ आपल्या महाराष्ट्रात तरी विरळाच सापडेल." असे उद्गार 'केसरी'कारांनी तेव्हा काढले.

लोकहितवादींची शरीरप्रकृती निकोप व बांधा मजबूत होता. धोतर, पेलूदार अंगरखा, उपरणे व मोठे पागोटे असा त्यांचा पोशाख साधाच पण व्यवस्थित असे. फक्त कोर्टकचेरीत ते सूट-बूट वापरीत. कर्मठपणावर त्यांनी आपल्या लिखाणातून टीका केली असली तरी स्नान, संध्या, पार्थिव पूजा, नैवेद्य, वैश्वदेव या साऱ्या गोष्टी ते नियमाने व भक्तिभावाने करीत व मुलाबाळांकडून करवून घेत. धार्मिक कार्यासाठीही ते उदार हस्ताने साहाय्य करीत. आपल्या आयुष्यात दानधर्मावर त्यांनी पंधरा हजारांहून अधिक रुपये खर्च केले! केवळ संस्थांनाच नव्हे तर गरजू व्यक्तींनाही ते सर्वतोपरी साह्य करीत. डाळे चुरमुऱ्याचे पोते, खारकांचे गाठोडे व मलम-मलमपट्ट्या इत्यादी सामग्रीनिशी गड्यासह बाहेर पडण्याचा रिवाज काही काळ त्यांनी ठेवला होता. भिकारी, महारोगी, यांना जातीने साहाय्य करणे हा त्या मागचा हेतू होता.

आपला गडी आजारी पडला असता पाय चेपून त्याची सेवाही रावबहादुरांनी केल्याचे नमूद आहे.

गोपाळरावांना प्रवासाची आवड होती. नोकरीनिमित्त त्यांना महाराष्ट्र, गुजरात व राजस्थान हे प्रांत पाहावयास मिळाले. दिल्ली दरबाराच्या प्रसंगी उत्तर भारताचा प्रवास घडला. त्याशिवाय त्यांनी सहकुटुंब हिंदुस्थानातील बहुतेक तीर्थक्षेत्रे पाहिली. यामागे धार्मिक हेतू होताच पण त्याचबरोबर भारताचे लोकजीवन जवळून न्याहाळण्याची मनीषाही होती. या साऱ्या प्रवासात त्यांनी विपुल दंतकथा, आख्यायिका व ऐतिहासिक सामग्री गोळा केली. ज्ञानसंग्रहाची त्यांची लालसा विलक्षण. त्यांना मराठी, इंग्रजी, संस्कृत, फारसी, गुजराती व हिंदी अशा सहा भाषा अवगत होत्या. मराठीप्रमाणे इंग्रजी व गुजराती या भाषांतूनही त्यांनी लेखन केले व फारसी-हिंदी या भाषांतून मराठीत अनुवाद केले. विद्वान-विदुषी यांच्याशी चर्चा करून गोपाळरावांनी आपल्या ज्ञानभांडारात सतत भर घातली. मेरी कार्पेंटर या लेखिकेने आपल्या Six months in India या ग्रंथात गोपाळरावांच्या उत्कट जिज्ञासाप्रवृत्तीचा आवर्जून निर्देश केला आहे. गोपाळरावांच्या विपुल पत्रव्यवहारावरूनही हा त्यांचा जिज्ञासू स्वभाव स्पष्ट होतो.

संपादन केलेले ज्ञानधन गोपाळरावांनी उदार अंतःकरणाने समाजपुरुषास अर्पण केले. स्वतःच्या वा वाचकाच्या 'केवळ मनोविनोदनां'साठी त्यांनी एक शब्दही लिहिला नाही. चाळिसाहून अधिक पुस्तके त्यांनी लिहिली, पण ती सारी ज्ञानप्रसारासाठी; प्रसंगी जाहिरात लावून त्यांनी आपले ग्रंथ फुकटही वाटले.

लोकजागृतीच्या या एकमेव हेतूने प्रेरित होऊनच त्यांनी अनेक नियतकालिकांना व सामाजिक संस्थांना सक्रिय मार्गदर्शन केले. १८५२ साली पुणे येथे दक्षणी प्रांतस्थ मंडळी ( The Dekkan Association ) नावाची ' राजकीय ' संस्था स्थापन झाली. तिच्यात रास्ते, पुरंदरे, विनीवाले, नातू यांच्यासारखे सरदार-जहागीरदार होते. तसेच गोपाळरावासारखे नवशिक्षितही होते. पुण्यातील नेटिव्ह लायब्ररी, वक्तृत्वसभा, ग्रंथोत्तेजक मंडळी व वाचनालय, मुंबई येथील इंदुप्रकाश, पुनर्विवाह मंडळी, अहमदाबादची प्रेमाभाई इन्स्टिट्यूट, दक्षिणी व गुजराती भाषांतर मंडळी, प्रार्थनासमाज, हितेच्छू आणि अजमेरचा आर्यसमाज इत्यादी अनेक सार्वजनिक केंद्रांशी त्यांचा जिव्हाळ्याचा संबंध होता. याशिवाय सार्वजनिक संस्थांतून उपयुक्त विषयांवर भाषणे देणे व ' लोकहितवादी ' या नावाचे नियतकालिक चालविणे ही कामेही त्यांनी केली.

आपल्या प्रदीर्घ आयुष्यक्रमात पुत्रेषणा, वित्तेषणा व लोकेषणा या तीनही ईषणा परिपूर्ण होऊन गोपाळरावांकडून मोलाचे सामाजिक कार्य घडले. परंतु प्रतिष्ठेबरोबरच अनेक अप्रतिष्ठेचे प्रसंगही त्यांच्यावर ओढवले :

(१) १५ जून १८६९मध्ये मुंबई येथे सुधारकांनी वेणुबाई परांजपे व पांडुरंगपंत करमरकर यांचा पुनर्विवाह घडवून आणला. त्याच्या प्रवर्तक ' सप्तर्षीं ' त गोपाळरावही होते; या विवाहाच्या विनंतीपत्रावर गोपाळरावांची सही होती. विवाहाला सहकुटुंब हजर राहण्याची व नवविवाहितांशी अन्नव्यवहार करण्याची विनंती प्रस्तुत पत्रकात आमंत्रकांनी केली होती. परंतु स्वतः गोपाळरावांनी यापैकी कोणतेही सहकार्य विवाहितांना दिले नाही. एवढेच नव्हे तर विनंतीपत्रकावर सही करण्याचे ' अधर्म्य ' कृत्य केल्यामुळे त्यांच्यावर बहिष्कार पडताच त्यांनी अहमदाबाद आणि बडोदे येथील ब्रह्मवृंद व द्वारकापीठाचे शंकराचार्य यांच्याशी बोलणी करून 'अपवाद प्रायश्चित्ता 'च्या मार्गाने स्वतःला पंक्तिपावन करून घेतले. सासरी असलेल्या मुलीला जाच होऊ नये, तिच्या ' सौभाग्याचा घात ' होऊ नये म्हणून लोकहितवादींनी प्रायश्चित्ताचे नाटक केले, त्यांना पश्चात्ताप झालेला नव्हता, ते मनाने सुधारकच होते, असे या घटनेचे स्पष्टीकरण करण्यात येते.

( २ ) इनाम कमिशनच्या कामाबाबतही गोपाळरावांना लोकापवाद सोसावा लागला. ' सरकारची तुंबडी भरून आपले व आपल्या मुलाबाळांचे कल्याण करून घेतले ' अशा आशयाचा तो लोकापवाद होता. एकूण इनाम कमिशनच्या कार्यपद्धतीवरच वृत्तपत्रांनी टीका केली. सरकारी चौकशीत मात्र गोपाळराव पूर्ण निर्दोषी ठरले.

(३) तिसरा अप्रतिष्ठेचा प्रसंग, त्याचे चिरंजीव कृष्णराव विलायतेहून परत आले त्या निमित्ताने १८७३ साली घडला. सनातनी विचारसरणीप्रमाणे गोपाळरावांचे चिरंजीव जलपर्यटन आणि परदेशगमन या कारणांनी ' निषिद्ध ' झाले होते. अशा स्थितीत त्यांना जर आपण सरळ घरात घेतले तर ब्रह्मवृंद ब्रामण्याचे शस्त्र उपसेल अशी गोपाळरावांना शंका आली. म्हणून त्यांनी कृष्णरावांची उतरण्याची स्वतंत्र व्यवस्था केली आणि शंकराचार्यांना ब्रह्मदंड देऊन कृष्णरावांना पावन करून घेतले. या गोपाळरावांच्या धर्मभीरुतेमुळे सुधारक वर्गाने त्यांचा उपहास केला.

(४) पुढे गोपाळरावांना पार्लमेंटरी फायनान्स कमिटीपुढे साक्ष देण्यासाठी सरकारतर्फे विलायतेस जाण्याचा योग आला. पण ' धर्माच्या आणि जातीच्या अडचणीमुळे मला विलायतेस जाणे शक्य नाही ' असे आपले उत्तर गोपाळरावांनी जाहीर केले. " परदेशास गेले तर विटाळ होतो ही गोष्ट सोडा " असे गोपाळरावांनी आपल्या लेखनातून पुनः पुन्हा सांगितले होते. त्यामुळे, गोपाळरावांचा नकार जाहीर झाल्याबरोबर ' इंदुप्रकाश ', ' नेटिव ओपिनियन ' ' विविधज्ञानविस्तार ' इत्यादी नियतकालिकांनी त्याच्यावर कठोर टीका केली.

गोपाळरावांच्या खाजगी जीवनात अनेकांना विसंगती दिसत असे. " ईश्वराचे वर्णन आणि भजन करावे...इतर उपचार-नैवेद्यादिक त्यास करू नये " असे गोपाळरावांचे मत होते. परंतु प्रत्यक्षात ते स्वतः नियमाने नैवेद्य, वैश्वदेव करावयाचे. " दगडास भजन आणि नैवेद्य कशास पाहिजे " असा बुद्धिवादी प्रश्न गोपाळराव समाजास विचारीत; परंतु स्वतः नेमाने देवळात जात, पार्थिव पूजा करीत. म्हणूनच कृष्णंभट पुराणिक यांच्यासारखे गोपाळरावांचे समकालीन " काय रे गोपाळराव, तुला कोण रे सुधारक म्हणतात ! " असा प्रश्न करीत असत.

गोपाळरावांचा विचारांतही अंतर्विरोध होता असे म्हटले जाते. भारतात पार्लमेंट हवे असे एकदा ते म्हणतात तर येथील लोकांना वेसण घालणारा राजाच पाहिजे, असाही विचार मांडतात. आपला व्यापार इंग्रजांनी बळकावला व म्हणून आपण दरिद्री झालो असे एका ठिकाणी सुचवितात तर दुसरीकडे, इंग्रज व्यापारी म्हणून येथे राहिले तरी हरकत नाही असे सांगतात.

गोपाळरावांनी अनेक संस्थांना वैचारिक व आर्थिक साहाय्य केले. परंतु जातीने एखाद्या संस्थेत काम करून ती नावारूपास आणणे हे त्यांच्या स्वभावात नव्हते. त्यामुळे अनेकदा त्यांच्यावर वावदूकपणाचा आरोप येई. "ज्या आमच्या रावबहादुरांच्या व्यवस्थेखाली 'ग्रंथोत्तेजक मंडळी'च्यासारखे लहानसहान काम निभेना, त्यांनी साऱ्या देशाच्या उलाढाली करून हा मूर्ख होता, त्याला अक्कल नव्हती, ही मीमांसा करणे व त्याच्या संबंधाने भराभर शिक्कामोर्तबानिशी सर्टिफिकिटे प्रसिद्ध करणे हे किती विलक्षण आहे?" असे मालाकारांनी म्हटले आहे.

'लोकहितवादीस गर्व फार' असा आरोप 'ज्ञानप्रकाशा'ने केला होता. सत्ता, संपत्ती, ज्ञान इत्यादींबावत अभिमान वाळगावा अशीच गोपाळरावांची परिस्थिती होती. पण त्यांना आपल्या त्या स्थितीचा गर्व होता असे दिसत नाही. गव्यापासून बव्यांपर्यंत ते सर्वांशी फार विनयाने वागत. सनातनी मंडळींची त्यांनी आपल्या लेखनातून निंदा केली आहे. पण तीही गर्वभावनेने केलेली दिसत नाही. आपल्या विशिष्ट वर्णाचा वा राष्ट्राचा त्यांना गर्व होता असे तर त्यांचा शत्रूही म्हणणार नाही.

"रावबहादुरांचे 'सरस्वतीचे सारसर्वस्व जे काव्य' त्याविषयी पहिल्यापासून अत्यंत अप्रेम दिसते, ही त्यांच्या अरसिकपणाची मोठी निशाणी म्हणून आम्ही समजतो." असे म्हणून मालाकारांनी गोपाळरावांना अरसिक ठरविले आहे. गोपाळरावांनी ललित वाङ्मयाची निर्मिती केली नाही हे खरे; तरीही त्यावरून ते अरसिकच होते असे म्हणणे धाडसाचे आहे. जेवताना बरोबरीच्या मंडळींना विनोदी ऐतिहासिक कथा सांगून ते हसवीत असत; पोहणे आणि प्रवास यांची तर त्यांना मनापासून हौस होती— यावरून गोपाळराव रसिक होते हे जरी सिद्ध झाले नाही तरी अरसिक नव्हते हे सहज सिद्ध व्हावे. शतपत्रातील 'नादविद्या' या पत्रात गोपाळरावांनी गायनकलेची प्रशंसा केली आहे तीही त्यांच्यावरील अरसिकपणाचा आळ दूर करण्यास साह्यभूत होऊ शकेल.

[ **टीप :** प्रा. रा. श्री. जोग यानी संपादित केलेल्या 'मराठी वाङ्मयाचा इतिहास, भाग चौथा' या ग्रंथात प्रस्तुत लेखकाने, लोकहितवादी यांचे वाङ्मय व विचार, या विषयाचे विवेचन केलेले आहे. त्या विवेचनाचे अनुसंधान राखून सदर लेखनाकडे पाहावे, ही नम्र विनंती—लेखक ]

• • •

# काही मराठी शब्दांच्या व्युत्पत्ती

• देवीसिंग चौहान

ज्ञानेश्वरीच्या १४ व्या अध्यायात ३३९ ओवी खालील प्रमाणे आहे :

स्वप्न गा जेयापरी । जागतेयातें न सिंतरी ।
गुणि तैसा अवधारी । न चळिजे तो ॥

येथील **सिंतरणे** या शब्दाचा वापर महानुभाव महाकवी नरेंद्र पंडिताने आपल्या रुक्मिणीस्वयंवर या काव्यात ओवी १५८ मध्ये केलेला आहे. या शब्दाचा अर्थ साधारणतः योग्य असाच देण्यात आलेला आहे. तो म्हणजे फसविणे, भ्रमात टाकणे.

दक्खिनी हिन्दीत हा शब्द अनेक वेळा अनेक कवींनी वापरलेला दिसून येतो. स्व. डॉ. अब्दुल हक यानी या शब्दाचा अर्थ वरीलप्रमाणे दिला आहे. महाकवी नुस्रतीच्या अलीनामा ग्रंथात या शब्दाचा वापर अनेक वेळा आलेला आहे. छत्रपती शिवाजी महाराजांचे वर्णन करीत असताना नुस्रती म्हणतो.

सिवा खेल उस सात करने मंग्या
उस शाने कू फन सूं सिंतरने मंग्या । १७-१७

अलीनामा ग्रन्थात हा शब्द २२·३१ ( सिंतरघात ) व ३२·३९ मध्ये आलेला आहे. तसेच नुस्रतीच्या दुसऱ्या प्रेमकथा काव्य गुल्शने-इश्क् मध्ये तो १९·१७२ व २०·१३७ मध्ये तो आलेला आहे. इन्ते निशाती या हैदराबादकर कवीने फूलबन या काव्यात ७७६, १९७९ ( चांदप्रति ) मध्ये तो वापरलेला आहे.

या शब्दाची व्युत्पत्ती देण्यात वा सुचविण्यात आलेली नाही. श्री. शिवाजीराव भावे यांच्या ज्ञानेश्वरीच्या शब्दकोशातही या व्युत्पत्तीचा संकेत केलेला नाही. श्री. कोलते ( रुक्मिणीस्वयंवर ) यांनीही उल्लेख केलेला नाही. या शब्दाचा ब्लोकच्या ग्रंथात उल्लेख आलेला नाही. श्री. कृ. पां. कुलकर्णी यांनी आपल्या व्युत्पत्तिकोशात याची व्युत्पत्ती सं. सिंध-हिंसायाम् अशी दिलेली आहे. परंतु ती चुकीचीच आहे.

सिंतरणे हा शब्द संस्कृत स्तृ-स्तृणोति, स्तृणुते किंवा स्तृ-स्तृणाति, स्तृणीते या संस्कृत धातूपासून झालेला असल्याचे आढळून येते. शब्दाचा अर्थ मोनियर वुइल्यमस याच्या कोशात असा आढळतो–आच्छादणे, झाकणे, व्यापणे, कपट्याने झाकणे, फसविणे असा अर्थ येथे दिला नाही. परंतु तो संदर्भावरून सम्भाव्य व शक्य वाटतो.

आद्याक्षरात ऋ स्वर असलेल्या संस्कृत शब्दाचे फार्सी प्राकृत, ग्रीक, लॅटिन आणि मराठी इत्यादी आर्य-भारतीय भाषांत रूपान्तर होत असताना ऋ अनेक रूपाने अवतरत असल्याचे भाषाशास्त्र कोविदांना ज्ञात आहेच. हाच स्तृ धातु २५०० वर्षांपूर्वी प्राचीन फार्सी ( वास्तविक आर्य, परन्तु पाश्चात्यांच्या मते फार्सी ) भाषेत वावरताना दिसतो. मा स्तरव असे वाक्य दारियसच्या शिलालेखात आलेले असून त्याचा अर्थ तोलमन याने ( पाहा-एन्शंट पर्सियन लेक्सिकान ॲन्ड टेक्स्टस पृ. १२८ ) पाप करू नकोस असा दिलेला आहे. स्तरु हे स्तृ चे कर्तृवाचक रूप असल्याचेही त्याने सांगितले आहे. याखेरीज आधुनिक फार्सी भाषेत सतुर्ग-सितुर्ग-सुतुर्ग असे तीन उच्चार होत असलेला एकच शब्द आढळतो. ( पाहा–स्टीनगास ) या शब्दाचा अर्थ—आढ्यताखोर, भांडखोर, भावनातिरेकी, उद्धट असा दिलेला आहे. हा शब्द संस्कृत स्तृ धातुपासूनच निघालेला असला पाहिजे. स्तृ पासून कर्तृवाचक नाम स्तरु संस्कृतात असून त्यापासून स-सि-सुतुर्ग हा कर्तृवाचक शब्द आलेला आहे. संस्कृत उ–व चा फार्सीत ग नित्य होतो. जसे गुर्ग ∠ वृकः—लांडगा. याच नियमाप्रमाणे स्तरु पासून सतुर्ग शब्द बनलेला आहे.

स्तृ धातूच्या भूतकालवाचक साधित स्तृत या रूपाचे नवीन फार्सीत सुतुर्दह हे रूप उपलब्ध असून त्याचा अर्थही योग्य असाच आहे. अर्थात हा शब्द संस्कृत स्तृच्या भूतकाळ साधिताचे रूपान्तर होय, याचा निश्चितपणे बोध होतो.

मराठीतील सिन्तरणे शब्दातील सि वरील अनुस्वार हा स्तृ धातु पंचम वा नवम गणातील असल्यामुळे मराठी रूपात कायम राहिला असे दिसते. परंतु हा अनुस्वार मराठी व हिन्दीत कायम आहे हे निर्विवाद होय. तो

अनुक्रमणिका

णसान्निध्याने कायम राहिला. हा अनुस्वार या धातूची वंशावळी सांगतो, हेच खरे.

### तास

ग्रामीण जनता शेतकरी असून तास हा शब्द आबाल-वृद्धांच्या तोंडी आहे. त्याची दखल आपल्या व्युत्पत्ति-कोशापर्यंत पोचलेली नाही. तास म्हणजे कुळव किंवा नांगराची वावराच्या एका बाजूकडून दुसऱ्याकडेपर्यंत खणीत जाण्याची नांगरलेली रेघ. जेवढे रान नांगरत जाईल तेवढ्याला तास म्हणतात. या अर्थाचा शब्द मराठी व्युत्पत्तिकोशात आलेला नाही. तो ग्रामीण जनतेत मात्र नित्य प्रयुक्त होत आला आहे. हा शब्द कृष्-कर्पति-नांगरणे पासून-कृष्टपासून बनलेला आहे. त्याची मूळ प्रकृती मराठी असणे कठीण दिसते. बंगालीत त्याचे रूप चास आहे. ओरिया भाषेत तो चास व तास या दोन्ही वेशांत आहे. पालीत त्याची वाढ कसि अशी झाली होती. ही सर्व कृष्ची रूपे होत. येथे क चा त झालेला आहे (पाहा इण्डो–इरानियन फोनॉलॉजी ग्रे, परिच्छेद ७६,११८,११९). पुणे जिल्ह्यात नगरच्या दिशेला चास नावाचे एक गाव आहे. तेथे शेतकी संशोधन केन्द्र आहे. या चास ग्रामनामाचे वरील तास शब्दाशी व पर्यायाने कृष् धातूशी नाते असावे असे दिसते. तसेच तासगाव अशी अनेक गांवे महाराष्ट्रभर आहेत. हे नावसुद्धा कृषीशी संबंधित असावे. मध्ययुगीन राज्यव्यवस्थेत देशमुख देशाधिकाऱ्यांकडे पडीत भूमी शेतीखाली आणण्याचे काम होते. या कामासाठी शासना-कडून प्रोत्साहन मिळे. देशमुख पडीत भूमी वहीत करवीत. तेथे वसती करवीत. जी भूमी वहीत झाली, जेथे नांगराचे तास घातले गेले, तेथे छोटीशी वाडी वसविण्यात येई. नवीन गाव वसत असे. अशा नवीन गावाला, तासगाव, चास हे नाव देणे वस्तुस्थितिदर्शक होते. या रीतीने ग्रामनामव्युत्पत्ती जुळते.

दृष्टान्त पाठात (२८) पुढील मजकूर आहे :

"तनधेले वावर असे : ते आंतु वाहीरि तनें दाटलें असे : तथा धाले असे : मग नांगरीजे : दुनीजे : कांसीया फेडी-जति : मग पेरीजे :

कुंभचासी तथा भार आंतौनि पीके : ना तैसेचि पेरीजे तरि न पीके : ॥"

डॉ. तुळपुळे यांनी कुंभचासी शब्दाचा अर्थ "कुंभाएवढे कणीस, (लक्षणेने) भरदार पीक" असा दिला आहे. येथे कुंभ म्हणजे घागर व चास म्हणजे कणीस हे दोन्ही अर्थ निर्धारेशी चुकीचे आहेत. संस्कृत कोशात कुंभचा अर्थ एक प्रकारचे माप ६४ शेरांचे असा दिला आहे. तसेच वरील व्युत्पत्तीनुसार चास शब्द कृषिपासून निघालेला आहे. कृषी शब्दाचा अर्थ पीक, सुगी असा दिलेला आहे. अर्थ होतो मणोगणती धान्य-लक्षणार्थ डॉ. तुळपुळे यांनी सुचविलेला निघतो. परंतु चास शब्दाची कुळीमुळी पाहिल्या-शिवाय तो हाती लागत नाही.

### सोप-विणे

सो-सोंपणे (अंगावर टाकणे, जबाबदारीवर देणे) हा शब्द ब्लोक ने समर्पयति धातूपासून व्युत्पादिला आहे (पाहा परिच्छेद १२५, १५३, १५६). परन्तु हे ग्राह्य वाटत नाही. त्यातील दोन अडचणी आहेत. एक अर्थाची व दुसरी ओ-काराची. समर्प यात अर्पण करण्याचा भाव आहे. अंगावर जबाबदारी टाकण्याची अर्थछटा नाही. दुसरे, सोपणेतील उ-ओकार कसा झाला याची. ब्लोकच्या वर्णनावरून हा बोध होत नाही. व्युत्पत्तिकोशात हीच व्युत्पत्ती पुनरुच्चारित केली आहे. हिन्दी सौंपना याची व्युत्पत्तीही अन्यत्र आढ-ळत नाही. संस्कृत स्पृ, स्पृणोति धातूचा अर्थ प्रदान करणे, देऊन टाकणे असा दिलेला आहे. स्पृ धातूपासून सुपणे हा शब्द केवळ नियमानुसारी आहे. त्यापासून सोपणे हे रूप सहजप्राप्त आहे. सोंपणे शब्दातील सों सानुस्वार आढ-ळतो. तो मूळ धातू पंचमगणातील असल्यामुळे शिल्लक राहिलेला दिसून येतो.

फार्सी भाषेत सि-सुपुर्दन हा धातु आहे. दन किंवा तन हा नामधातुवाचक प्रत्यय सोडल्यास सि सुपुर हे रूप संस्कृत स्पृ धातूपासून निघाल्याचे येथे स्पष्ट दिसते. सुपुर्द करणे म्हणजेच सोंपणे होय हे फार्सी शब्दांची ओळख असणाऱ्यांना विदित आहेच. व्युत्पत्तिकोशात सुपुर्द दिलेला आहे. पण तो फार्सी आहे एवढाच उल्लेख केलेला आहे, स्तृ स्पृ धातूंमधील र फार्सीत कायम राहिलेला आहे. मराठीतील सितरमध्येही तो कायम आहे पण येथे मात्र त्याचा लोप झालेला आहे. शब्दांतर्गत आलेल्या ऋ चा मराठीत लोप झाल्याची अनेक उदाहरणे देता येतील. प्रावृष पासून पाऊस त्यांपैकीच होय. एकूण समर्पच्या ऐवजी स्पृ पासून सोंपणे शब्द व्युत्पादणे जास्त संयुक्तिक वाटते.

### सुर-नाई

सूर नावाचे एक तोंडाने वाजविण्याचे वाद्य विशेष

ग्रामीण भागात आजदेखील वापरले जात असते. परंतु याची दखल कोश व व्युत्पत्तीपर्यंत पोहोचली नाही. ग्रामीण वाजंत्रीसंचात ढोलके, सूर व सणई ही अविभाज्य त्रयी आहे. ही तिन्ही एकत्र असतातच. सूर हे फुंकण्याचे वाद्य सांप्रत सरळ रेषेच्या आकाराचे असते. त्याचा ध्वनी आरोहावरोह विरहित एकसारखा असतो. हा सूर शब्द संस्कृत शृंग पासून आलेला आहे. सुराचा आवाज इतर ध्वनींपेक्षा मोठा असतो. एखाद्या मुलाने भोकाड पसरले, तो मोठ्याने रडावयास लागला तर म्हणतात—तुम्ही सूर लावला का? म्हणजे मोठ्याने का रडतोस? दक्खिनी हिन्दी व हिन्दीत सुरणाई असा शब्द आहे. तो शृंग + नाद पासून बनलेला आहे. हे स्पष्ट आहे. नदीची नई व सखीची सई सर्वांच्या परिचयाच्या आहेत. सुर-नाई म्हणजे शृंगाचा सिंगाचा (फुंकण्याचे वाद्यविशेष) वा सुराचा ध्वनी. याचप्रमाणे कर-र्नाई हा शब्द हिन्दीत वापरात आहे. दक्खिनी हिन्दीच्या महाकवी नुसतीच्या तारीखे-इस्कंदरी काव्यात

> फुटे कर्रा-नायां ते दुश्मनके गोश
> गया मग्ज़ भेजा हो जागे ते होश। ५.७

कर्रा-नाई या हा शब्द कर्णनादाचाच समकाय आहे. र चे द्वित्वदेखील कर्णमधील जोडाक्षरामुळे नियमानुसारीच म्हटले पाहिजे. एवंच सुरनाई करनाई हे शब्द शृंगनाद, कर्णनाद पासून निघालेले आहेत. मराठी सूर (फुंकून वाजविण्याचे साधन) शृंगपासून निघाला हे उघड आहे. शृंगपासूनच शिंगही निघाले.

## सवते

ते हा शब्द सर्वनामाव्यतिरिक्तही मराठीत प्रयुक्त होतो. उदा० मी पाच ते आठ वाजण्याच्या दरम्यान येईन. येथे ते शब्द सर्वनाम नसून अव्यय आहे. या शब्दाची नोंद व्युत्पत्तिकोशात नाही. हा शब्द सं. तस् प्रत्ययापासून निघाला असून त्याची अन्य रूपेही मराठीत वावरत आहेत. पुरता–ती–ते यातही तस् हा प्रत्यय प्रविष्ट आहे. पुरता शब्द पूर्ण-तस पासून बनला आहे. तसेच वरता-ती-ते म्हणजे वरच्या दिशेस बाजूने किंवा पश्चिमेस हा शब्द उपरि+तस या पासून व्युत्पादित होतो, तसेच ग्रामीण मराठीत सवता ती-ते हा शब्द क्रियाविशेषण या रूपाने वापरात आहे. मी हे काम सवते केले. या ठिकाणी सवते म्हणजे स्वतःचे, स्वतःपासून. येथे स्व+तः हीच व्युत्पत्ती लागू पडते. व्युत्पत्तिकोशात या पद्धतीने या शब्दांची व्युत्पत्ती सुचविलेली नाही. ब्लोकच्या विवेचनातही उल्लेख नाही. ते हा तृतीया व पंचमीचा प्रत्यय म्हणून अवधी भाषेत नित्य प्रयुक्त होतो, त्याचे व्रजभाषीय रूप तै आहे. त्याची अन्य रूपे तें, थें, तैं, थैं अशीही आहेत. व्रज, अवधीतून येऊन दक्खिनी हिन्दीतही तो नित्याचाच प्रयुक्त होतो. वर उद्धृत केलेल्या द्विपंक्तीत तो दोनदा आलेला आहे. त्याचा अर्थ पासून असा होतो. तो गुजरातीतही असून त्याचे रूप थी असे आहे. तो राजस्थानीतही आहे.

## पोत, पोते

मराठीत पोत (स्त्रीच्या गळ्यातील अलंकार) पोत (मशाल, काकडा जाळण्याचा,) पोत (कपड्याची वीण, कुलकर्णी म्हणतात ते कापड सूत नव्हे). पोते, पोतडी. (पिशवी-लहान व मोठी) असे शब्द प्रचलित आहेत. पोते शब्दाची व्युत्पत्ती देताना व्युत्पत्तिकोशात संस्कृत, प्राकृत, फार्सी आदी समशब्द देऊन शेवटी त्यांनी शब्द उपस्थित केला आहे की " मूल संस्कृत आहे की फार्सी आहे. "? यादवकालीन मराठीत श्री. तुळपुळे यांनी (पृ. ३४४) पोतडी हा शब्द फार्सी शब्द पोतह (वास्तविक फोतह) पासून निघाला असे बिनधोक सांगितले आहे. फार्सीच्या मराठीवरील संस्काराची तुळपुळे यांनी दिलेली ९ शब्दांची बरीच यादी निराधार आहे. वस्तुतः पोत-ते शब्द मराठीत फारच जुना आहे. गोविंदप्रभु चरित्रात (श्री कोलते) तो पोत म्हणजे काकडा या स्वरूपात वावरलेला आहे. तसेच पोतपासून पोवणे म्हणजे (मणिसूत्रात) ओवणे हा शब्द भास्करभट्ट बोरीकरांच्या उद्धवगीतेत (ओ. ३७८) वापरला गेलेला आहे. तसेच पाहा. म्हाइंभट्टकृत श्रीकृष्णचरित्र पृष्ठ ८७.७,१०.

पोत, पोते, पोतडी हे शब्द संस्कृत प्र+उत. प्रोत पासून झालेले आहेत. वे धातूचे उत हे भूतकालीन धातुसाधित. वे धातूचा अर्थ विणणे, ओवणे, असा दिलेला आहे. प्रोत म्हणजे शिवलेले, विणलेले. अर्थात थैली, पोते, काकडा या अर्थी असलेल्या पोतमध्ये कापडाची गुंडाळी केलेली असते. क्वचित शिवलेले असते. हा शब्द संस्कृतमध्ये चांगलाच प्राचीन आहे. छांदोग्योपनिषदात तो वापरल्याचे कळते. र च्या लोपाने तो मराठीत पोत म्हणून आला. परंतु संस्कृतमध्ये पोतकः असा शब्द कोशात दिल्याचे कोशावरून आढळते. याचा मुगावा असा की हा शब्द प्राकृतातून पुन्हा संस्कृतात गेला असावा. असे अनेक प्राकृत शब्द संस्कृतात आढळतात.

फार्सीत फोतह हा शब्द पोत्यासाठी दिसून येतो. तो संस्कृत पोतकः पासून फार्सीत गेला असावा. तसेच तो संस्कृत प्रोतपासून बनलेला नाही. कारण संस्कृतमधील प्र चे फार्सीत फर असे रूप होते. र कायम राहतो. उदाहरणार्थ प्रमाणम्-फर्मान, प्रिय-फिरी, क्री. परंतु फोतह मध्ये र चा लोप झालेला आहे. म्हणून नंतरच्या काळात पोतकचे रूपान्तर फोतहमध्ये फार्सीत झाले. अशी उदाहरणे मराठीत सर्वत्र आढळून येतात. अरबी फूतत् शब्दाचा अर्थ एकप्रकारचे पट्टया पट्टयाचे भारतीय कापड ज्याच्या विजारी करतात ते, असा अर्थ फार्सीकोशात दिलेला आहे. यावरून तो भारतीयच आहे असे स्पष्ट होते. ज्याप्रमाणे अरबस्तानातील विशेष चांगला असलेला घोडा भारतात आवक होत राहिला; व त्याला तेजी ( अरबी-ताजी ) असे नाव मिळाले, तसे भारतातून विशेष चांगला असा पायजम्याचा कपडा अरबस्तानात गेला व त्याला फूतत् ( अर्थात फोतह वा फोतक ) असे नाव अरबी भाषेत प्राप्त झाले. यावरून भारतातून अरबस्तानात होत असलेल्या जावक मालाची कल्पना येते.

एस. एम. एच. नयनार यांनी 'अरबी प्रवाश्यांचे दक्षिण भारताचे ज्ञान' नावाचा ग्रंथ इंग्रजी भाषेत शक १८६४ मध्ये मद्रास विद्यापीठाच्या वतीने प्रकाशित केला आहे. त्यात नयनार यांनी अरबी प्रवाश्यांचे दक्षिण भारतविषयक भूगोल, भाषा, व्यापार उदीम, इत्यादी विषयांचे ज्ञान याचा आढावा घेतलेला आहे. अरबी भाषेत फूतहचा अर्थ सिंद मधून आयात झालेले कापड असा दिलेला आहे. ते जाड, आखूड असून कमरेभोवती गुंडाळण्यासाठी त्याचा उपयोग करतात असे म्हटले आहे. अजीज या ग्रन्थकाराचा उतारा देऊन असे प्रतिपादिले आहे की, हा फूतह अरबी असल्याचे ऐकिवातही नाही. त्याचे म्हणणे असे की तो शब्द अरबी असणे कमी संभवनीय आहे. परंतु हे अरबी वाळवंटातील उंटवाले नेहमी वापरीत असतात. तसेच समाजातील गरीब वर्ग हे कापड वापरतो. दुसऱ्या एक अरब विद्वानाचे असे मत नयनार याने नोंदविले आहे की हा शब्द सिंदमधून अरबस्तानात आलेला आहे. हा शब्द पोतह शब्दापासून बनलेला आहे. हे कापड यमन प्रदेशात विशेष वापरले जाते. हा शब्द अतिशय रूढ असल्याने अरबी भाषेत त्या शब्दापासून फुव्वत असे क्रियापदही सिद्ध करण्यात आले आहे. वरील चर्चेवरून अरबस्तान इत्यादी देशांत आजही निर्यात असलेल्या भारतीय रंगीत लुंगीची वाचकाला आठवण होईलच. हा व्यापार १००० वर्षांचा तरी जुना आहे.

फूतहचे लघुत्वदर्शक रूप अरबी भाषेत फुइतह असे करण्यात येऊन हा शब्द ईजिप्त-मिस्रमधून आयात झालेल्या लहान लहान चौकोनाकृती तुकड्यांसाठी येतो. हे लहान आकाराचे रुमाल होत. जेवणाचे वेळी मांडीवर टाकण्यात येतात. हेतू की उष्टे पडून अंगावरील कपडे मलीन होऊ नयेत. भोजनोत्तर या 'फुइतह' ने तोंड पुसण्यात येते.

प्लॅट्स या आधुनिक पंडिताने आपल्या हिन्दुस्थानी कोशात हा शब्द हिन्दी-फेंट-फेंटा शब्दापासून निघाल्याचे सांगितले आहे असे श्री. नयनार यांनी उल्लेखिले आहे. परंतु वरील सर्व चर्चेवरून प्लॅट्सची व्युत्पत्ती चुकीची आहे हे ध्यानी येईल.

मराठी ग्रामीण जनता आजदेखील दी म्हणजे दिवस शब्द वापरते. तुला परत यावयाला किती दी लागतील? उत्तर येईल-मला दोन, तीन दी लागतील. व्युत्पत्तिकोशात दी ची व्युत्पत्ती दिवस पासून सूचित केलेली आहे. ती बरोबर नव्हे. दी शब्द संस्कृत द्यु पासून निघालेला आहे. ही व्युत्पत्ती सरळ लागते. मौजेची गोष्ट ही की, दी हा शब्द फार्सी भाषेतही प्रयुक्त होतो. त्याचा प्रयोग वेगळ्या रूपात होतो. दीशब म्हणजे काल, कालची रात्र, शब हा शब्द क्षपा शब्दापासून आलेला आहे. दीशब म्हणजे एक दिवसापूर्वीची रात्र. तसेच दी-रोज म्हणजे काल, कालचा दिवस. दी शब्द द्यु पासून व रोज शब्द संस्कृत रोचस् पासून निघालेला आहे. ( पाहा ग्रे-शब २८९, २९०, २९३, ४८१, आणि रोज ९९, १५९, १६७, ३४९ )

### माया

माया म्हणजे पैसा, संपत्ती या अर्थाने हा शब्द मराठीत नेहमी प्रयुक्त होतो. ग्रामीण भागातही आजदेखील हा शब्द उपयोजिला जातो. जवळची माया संपलेली दिसते, म्हणजे पैसा, पुंजी, संपत्ती. व्युत्पत्तिकोशात सं. मा धातूचा उल्लेख करण्यावरच समाधान मानले आहे. हा शब्द संस्कृत मात्रा पासून निघालेला आहे. त्याचा अर्थ दौलत, संपत्ती असा दिलेलाही आहे.

दक्खिनी हिन्दीमध्येही ह शब्द वापरला जातो. हैदराबादकर कवी मुल्ला गवासीने ( शक १५६१ ) आपल्या

तोतीनामा (शुक बहात्तरी) या काव्यात तो खालील प्रमाणे वापरलेला आहे.

> पड उस खेल के शुग्लमें सुबहो-शाम
> गंवाया जो कुच था सो माया तमाम। ७०२

विजापूरकर कवी मुल्ला नुस्रती (मृ. शक १५९६) याने गुल्शने-इश्क या काव्यात (८·४८) वापरलेला आहे. हा शब्द फार्सी भाषेतही रुढ आहे. तेथे त्याचे रुप मायह असे आहे. तो सर-माया, त-तुनुक-माया सारख्या सामासिक शब्दांतही वापरला जातो. सर शब्द सिर पासून आणि तनुक शब्द संस्कृत तनु+क पासून निघालेला आहे. एवंच मायाचे साम्राज्य बरेच पसरलेले आहे. शुद्धलेखनावरुन गवासीने हिन्दीतील व नुस्रतीने फार्सीतील रुढ शब्द वापरले असे अनुमान करता येते.

## जनमजुग

जनमजुग वा जन्मजुग हा शब्द खेडुतांत सर्वतोमुखी आहे. व्युत्पत्तिकोशात जन्म शब्द आलेला आहे. परंतु जनमजुगचा उल्लेख नाही. किंवा जुग शब्दाचा वेगळा उल्लेखही आलेला नाही. जुग शब्द संस्कृत युग शब्दापासून आलेला आहे. हे उघड आहे. संस्कृतात युग शब्दाचा सन्दर्भ अर्थ जन्म असा दिलेला आहे. पाहा. (याज्ञवल्क्य-मिताक्षरा १·९६) जन्म व युग या दोन समानार्थी शब्दांचा जोडशब्द मराठीत अज्ञजनांच्याही तोंडी वावरताना दिसतो.

हा जनमजुग शब्द दक्खिनी हिन्दीमध्येही वापरात आहे. तो बहुधा मराठीतून घेतलेला असावा. नुस्रतीच्या गुल्शने इश्क या काव्यात (अध्याय २७ युग्म १७८) खालील द्विपंक्ती आहे. (तसेच १४·८१ व २५·४७ पाहा)

> कि "यो मुल्क लई दूर मेरा च है
> यो सब मुल्क हौर जीव तेरा च है।"

> दिखा घातकी बातमें लाक छंद
> जनमजुग का पाडया मेरे गल में बन्द

या चार ओळींत लईच, घातकी, जनमजुग, बंद हे केवळ मराठी शब्द आलेले आहेत. मराठी जनसारणाच्या वापराप्रमाणेच येथे जनम-जुगचा उपयोग दिसून येईल. नुस्रतीच्या अलीनामा या महाकाव्यातही (अध्याय २८ द्विपंक्ती २३९) तो आलेला आहे.

## आगात

साधारणतः शेतीतील पेरणी दोन वेळा होते. पहिली ज्येष्ठाच्या अखेरीस वा आषाढाच्या आरंभी आणि दुसरी दसऱ्यानंतर, दिवाळीच्या सुमारास. पहिली पेरणी खरीफाची. या पेरणीस खेडूत आगाताची पेरणी म्हणतात. जे पीक येते त्याला आगाताचे पीक म्हणतात. आगातात पिवळी ज्वारी, भुईमूग, कापूस, उडीद, मूग, बाजरी आदी पेरतात. रबीच्या पीकांत जोंधळा, गहूं, हरभरा, आदी पेरतात. आगात शब्द ग्रन्थनिविष्ट झालेला नाही. तरी शेतकरी वर्गाच्या सर्वत्र तोंडी आहे. हा शब्द संस्कृत अग्र+तन् पासून झालेला दिसतो. ग्र या संयुक्ताक्षरामुळे अ ला आलेले दीर्घत्व नियमानुसारीच आहे. आगात म्हणजे खरीफ, खरीफाचे पीक असा अर्थ रुढ आहे.

पेरणीचे विशेषण म्हणून आगोटी हा शब्द वापरण्यात येतो. आगोटी म्हणजे सर्वांच्या अगोदर, सर्व प्रथम पेरलेले. हा शब्द आगात व रबी दोन्ही पिकांच्या पेरणीला लावतात. त्याचा अर्थ एवढाच होतो की प्रथम पेरलेले. हा शब्द अग्र+उप्त पासून निघालेला दिसतो. आग+उत > अगोटी असा शब्द बनला. एक अनामिक शेतकऱ्याच्या वर्णनातील आगोटी शब्दाचा वापर पाहा.

> बी हि वियाणे घाली उत्तम, आगोटी पेरणी
> सदा तो दक्ष असे खुरपणीं।

आगोटी शब्दही व्युत्पत्तीकोशात आढळत नाही.

## लई, उलिसे

लई व उलिसे, उलीसे दोन्ही शब्द व्युत्पत्तिकोशात दिलेले आहेत. लई शब्दासाठी अतिशय इत्यर्थे लोकोक्तैः असा हेमचंद्राचा आधारही आहे. हा शब्द अपभ्रंशकालात रुढ झाला आहे हे उघड आहे परंतु लईची व्युत्पत्ती लयापासून प्रश्नचिन्हांकित करून दर्शविली आहे ती योग्य नव्हे. लई शब्द सं. बहुलम् पासून निघाल्याचे आता विद्वानांनी मान्य केलेले आहे. या शब्दाचा वापर दक्खिनी हिन्दीत फारच होतो. हा केवळ मराठी शब्द असून तो आजदेखील खेड्यातून सर्वतोमुखी आहे. दक्खिनी हिंदी मराठीच्या परिसरात व आसमन्तात वाढलेली असल्यामुळे तो दक्खिनीत बाहुल्याने दिसतो. वर जनमजुग संबंधी दिलेल्या दक्खिनीच्या उद्धरणात लई शब्द आलेला आहेच.

उलीसे, उलिसे शब्दांची व्युत्पत्तीकोशात अल्पीयस पासून दिलेली आहे. परंतु ती योग्य दिसत नाही. उली हा

शब्द लघूपासून आलेला दिसतो. लईच्या संबंधात जसा वर्ण-विपर्यय घडून आला, हिंस्र पासून जसा सिंह निघाला तसेच स्थानांतर उळीच्या जडणघडणीत घडून आलेले आहे. उली उली जेव म्हणजे छोटा घास घे, बोकणे मारू नकोस, असा अर्थ. सा–से अर्थात सारखा या अर्थी वेगळा शब्द आहे.

## सुगी

सुगी म्हणजे शेतातील पिकाच्या कापणीची व खळे करण्याची वेळ. व्युत्पत्तिकोशात हा शब्द कानडी सुग्गी-पासून आल्याचे सांगितले आहे. वस्तुतः हा कानडी शब्दच संस्कृत सू-ग्रीष्मक पासून निघालेला दिसतो. हेमचंद्रसूरींनी आपल्या देशीनाममालेत (८·३९) सुगिम्हओ (स्त्रीलिंग) असा शब्द दिलेला आहे. याचा अर्थ असा की हा तद्भव शब्द आहे. खऱ्या अर्थाने देशी शब्द नव्हे. कोणत्याही पिकांच्या आगात वा रब्बी- कापणीला हा प्रयुक्त होतो.

## हुडा

हुडा शब्द मराठीत नित्यपरिचयाचा आहे. अफजलखान वधाच्या (शक १५८१) अज्ञानदासाच्या पोवाड्यात तो वापरला आहे. (य. न. केळकर भाग. १ पृ. ९) पानिपतच्या पोवाड्यातही (पृ. १२९) तो आला आहे. अर्थात शकांच्या सतराव्या शतकात हा शब्द रूढ होता. आजदेखील हा शब्द खेड्यातून नित्यप्रयुक्त आहे. एखाद्या निर्बुद्ध, मठ्ठ पण जाडजूड वाढलेल्या पोरापोरी संबंधाने–एवढा मोठा हुडा झाला आहेस–असे अलंकारिक भाषेत नुसत्या वाढीकडे संकेत करून बोलले जाते.

हुडा शब्दाच्या व्युत्पत्तीसंबंधी तो शब्द कानडी हुडा (= किल्ला) पासून निघाल्याचे सांगितले आहे. तसे हुड म्हणजे दगडांची रास असा पर्याय दिलेला आहे. या पलीकडे हुडा शब्दाची व्युत्पत्ती शोधण्याचा प्रयत्न झालेला नाही. ब्लोकमध्ये हुडा शब्द चर्चिलेला नाही; हुडा शब्दाचा अर्थ मराठी भाषेत बुरूज असा होतो.

हुडा हा शब्द संस्कृत ऊर्ध्व + कम् पासून आलेला दिसतो. आर् पिशल याने आपल्या प्राकृत व्याकरणात उर्ध्व शब्दाची उद्ध (डॉ. हेमचन्द्र जोशीकृत हिन्दी भाषान्तर पृ. १५६) आणि अर्धमागधी व जैन महाराष्ट्री, भाषांमध्ये उड्ढ अशी रूपे होत असल्याचे नमूद केलेले आहे. अर्धमागधीमध्ये श्रद्धा शब्दाचे रूप सड्ढा, श्राद्धचे सड्ढ आणि श्रद्धिनचे सड्ढि होत असल्याचे त्याने (पृ. ३३३) सांगितले आहे. मराठीत द्विअर्धचे रूप दीड आणि सार्धचे साडे (साडेपाच आदी) असल्याचे सर्वविदितच आहे. यावरून ऊर्ध्व शब्दाचे रूप उड्ढ होणे नियमानुसारी आहे. संस्कृतात ऊर्ध्वम्, ऊर्ध्वकम् या नामाचा उंची किंवा उंच ठिकाण असा अर्थ सापडतो. ऊर्ध्वकम् शब्दाचे रूपान्तर उड्ढा असे होऊन उच्चारसौकर्यार्थ त्याचे हुडा असे रूप झाले असणे नियमानुसार ठरते.

महानुभाव कालीन मराठीत ऊर्ध्व शब्दाचे उर्ध्वा असे झालेले रूप खळोवासाच्या सह्याद्रिवर्णनात प्रयुक्त झालेले आहे (पाहा ओवी ५०,२३२,२३३). हे वर उद्धृत केलेल्या रूपाशी सुसंगतच आहे.

विजापूर येथील गडाच्या एका बुरजाची बांधणी प्रथम अली आदिलशाह याच्या काळात शक १४९८ (हिजरी ९८४) मध्ये करण्यात आली असल्याचा एक फार्सी शिलालेख पुण्याचे फार्सीभाषाकोविद डॉ. भगवत दयाळ वर्मा यांनी आपल्या ग्लोरीज ऑफ बीजापूर या फार्सी शिलालेखाच्या वर्णनग्रन्थात चर्चिला आहे. या लेखात हुलमुक असा शब्द वापरलेला आहे. या शब्दाचा अर्थ बुरूज असल्याचे डॉ. वर्मा यानी सुयोग्य रीतीने सांगितले आहे. येथे निर्देश्य गोष्ट ही की हा हुलमुक शब्द उड्डमुख, ऊर्ध्वमुख या शब्दापासून निघालेला असून त्याचा अर्थ, मोठा हुडा, मोठा बुरूज असा होतो, यावरून शंका असू नये.

या शिलालेखानंतर २८ वर्षांनी अब्दुल या कवीने आपल्या आश्रयदात्या द्वितीय इब्राहीम आदिलशाहाचे चरित्र इब्राहीम नामा या ग्रन्थात वर्णिले आहे. त्यातील दोन द्विपंक्ती (२४३, २४६) मध्ये हुलमुक शब्द वापरला आहे. पंक्ती अशा

रख्या सीसफूल कर महल राजना
जे कै तास हुलमुक बजना बाजना। २४३
दिसे तास हुलमुक सो मिल रूप यूं
गले बांध अशर्फी × × शहर ज्यूं। २४६

याचा अर्थ असा की महाराष्ट्र व विजापूरच्या आसमन्तात हुलमुक शब्द शक १५५० पर्यंत वापरात होता.

मराठीत शब्दाचे रूपान्तर होताना 'ड चा ल' झाल्याची उदाहरणे सापडतात. संस्कृत तडाग पासून तलाव झाल्याचे पिशल यांनी सांगितले आहे. तलाव बरोबरच काही रूपे तलाय, तलाअ अशीही सापडतात (पाहा जोशी पृ. ३४१ ३४२) झल ब्लोकनेही (परांजपे परिच्छेद १४६) ड पासून ल ळ झाल्याची चर्चा केलेली आहे. संस्कृत गुड शब्दापासून मराठी गूळ झाला हे त्याने सांगितले आहे. खेळणे (क्रीड), गोल (गौडः), नाळ (नाडी), पिळणे (पीड), सोळा (षोडश) इत्यादी रूपान्तरे याचीच प्रतीक होत. म्हणून हुलमुक हा शब्द हुडापासूनच झालेला आहे हे निर्विवाद असावे.

• • •

# मी पाहिलेले रवींद्रनाथ

एस्. एस्. खानोलकर

टागोरांच्या शांतिनिकेतनमध्ये सुमारे अडीच वर्षे राहण्याचा सुयोग मला प्राप्त झाला होता.

मोठ्या लेखकांच्या लेखनाबरोबर त्यांचे खाजगी जीवन-ही समजून घेण्याची उत्सुकता सामान्य जनात असते. ज्यांच्या जीवनात विरुद्ध टोके अगर परस्परविरुद्ध गोष्टी जेवढया जास्त तेवढे त्यांचे जीवनचरित्र, विशेष वाचनीय बनते. मोठे चढउतार अगर परस्पर विरोधी गोष्टी नसताही रवींद्रनाथांचे चरित्र वाचनीय बनले याला कारण अनेक बाबतींत त्यांनी दाखविलेले असामान्यत्व होय.

सामान्य माणसाला जगात पुढे येण्यास शालेय शिक्षण, विश्वविद्यालयांनी दिलेल्या पदव्या उपयोगी पडतात. पण ते शिक्षण व पदव्या घेण्याची परिस्थिती अनुकूल असूनही टागोरांनी त्याकडे पाठ फिरवली. घर शहरात असूनही खेड्यात राहणे त्यांनी पसंत केले.

विद्वान माणसे विद्वानांच्याच सहवासात राहणे पसंत करतात. कमी बुद्धिमत्तेची माणसे अगर सामान्य अशिक्षित माणसे यापासून दूर राहणे पसंत करतात. टागोरांच्या भोवतालची माणसे त्यांच्यापेक्षा कमी योग्यतेची होती पण ते त्यातच रममाण झालेले होते.

लेखकांना वाचन व लेखन याला जेवढा जास्त वेळ मिळेल तेवढा पाहिजे असतो. टागोरांना स्वतःच्या उदर-निर्वाहाकरता व्यवसाय करण्याची आवश्यकता नव्हती. त्यांनी पुष्कळ लिहिले व वाचनही फार केले, पण त्यांचे जीवन तेवढ्या गोष्टींनी मर्यादित नव्हते. त्यांनी आपल्या जीवनात एक मोठी शिक्षणसंस्था चालविली. त्या संस्थेला सरकारी मदतही नव्हती व मान्यताही नव्हती. या एका गोष्टीमुळे त्यांनी आपल्या जीवनात खडतर कष्ट, यातना व चिंता ओढवून घेतल्या.

## त्यांचा स्वभाव

स्वभाव अत्यंत भीडस्त. ते सहसा कोणाचे मन दुखविणे पसंत करत नसत. विशेषतः लहान मुलांची कसलीही इच्छा अगर विनंती ते पुरी करीत. बरेच विद्यार्थी त्यांना बाहेर बोलावून आपल्याबरोबर फोटो काढून घेत. ज्याच्यात मुलांना आनंद त्यात ते स्वतःही आनंद मानीत. भेटायला आलेल्या माणसाचा दर्जा लक्षात न घेता त्याचे समाधान होईपर्यंत गप्पा मारीत. मग लेखनाला त्यांना एवढा वेळ कसा मिळाला? याचे उत्तर त्यांना लाभलेली असामान्य प्रकृती हे होय. त्यांना तीन-चार तास झोप पुरत असे. रात्री अकरा वाजता झोपून पहाटे तीन वाजता ते उठत. बहुतेक त्यांचे लिखाण मूळ बंगालीतच आहे. त्यांच्या लिखाणाचा एक दशांश भाग इंग्रजीत आलेला आहे. टागोर मुख्यतः कवी असल्यामुळे त्यांच्या साहित्याचे खरे दर्शन त्यांच्या काव्याच्याच द्वारे होऊ शकेल.

## भाषासौंदर्य व टागोर

कुठल्याही कलाकाराला त्याच्या ठिकाणची उपजत-देणगी ही जशी त्याला उपयोगी पडते, त्याचबरोबर त्याला परिश्रम व चिकाटी याचीही जोड असावी लागते. टागोर विद्यार्थ्यांना हीच गोष्ट सांगत. ते म्हणत कीं, त्यांनी वाचन-लेखनाकरिता अफाट परिश्रम केले. कैक वर्षे दिवसातून सोळा-सोळा तास वाचनलेखनात घालविले. बंगाली, संस्कृत व इंग्रजी या तीन भाषांतील प्राचीन वाङ्मय वाचून काढले. यामुळेच आपल्याला सुंदर भाषाशैली प्राप्त झाली.

## घर हेच विश्वविद्यालय

त्यांचे एक निकटवर्ती विद्यार्थ्यांना सांगत की, टागोर विश्वविद्यालयात न जाता विद्वान बनले यात आश्चर्य मान-ण्याचे कारण नाही. माशाला ज्याप्रमाणे आंघोळीची जरुरी नसते, त्याप्रमाणे त्यांचे घर हेच विश्वविद्यालय असल्या-मुळे वेगळ्या विश्वविद्यालयाची त्यांच्या बाबतीत जरुरीच नव्हती.

## शांतिनिकेतनमधील आठवणी

मी १९३३ ते ३९ या दरम्यान शांतिनिकेतनमध्ये होतो. त्या वेळी टागोरांनी आपल्या वयाची सत्तरी ओलांडलेली होती. हृदयविकाराची त्यांची तक्रारही सुरू झाली होती.

अभिप्राय तरी देवलांनी शापसंभ्रमाच्या पहिल्या दोन आवृत्त्यांमध्ये छापला म्हणूनच आपणांस उपलब्ध आहे,– अर्थात त्यातला काही भाग गाळून जेवढा त्यानी छापला तेवढाच. तेवढयावरच आजपर्यंतच्या लेखकांनी गुजराण केली. आपणासही तसेच करणे भाग आहे. शापसंभ्रमाच्या पहिल्या आवृत्तीच्या आरंभी आणि दुसऱ्या आवृत्तीच्या शेवटी छापलेला अभिप्रायाचा उतारा येणेप्रमाणे आहे. —

EXTRACT FROM THE REPORT OF THE SANGITA KADAMBARI PRIZE EXAMINATION COMMITTEE

"The Ms. marked असती चतुर etc. deserves to be ranked as the first among the competing works. ...... The scenes are all judiciously chosen and arranged, and the interest is sustained throughout. The first three acts are occupied by the love-scenes above alluded to and at the end of the third the audience is left musing over the close of a tragic piece made sublime by the ascetic sanctity of कपिंजल and the dutiful resolve of महाश्वेता. The fourth act opens with चंद्रापीड's entrance by the अच्छोद lake of which he chants a very sweet though short description. The progress of love between both the heroines and their lovers is based on the principle of 'love at first sight;' but still महाश्वेता's superior gravity and कादंबरी's childlike openness of heart are distinctly depicted. पुंडरीक's weakness, due to the circumstances of his birth, is very ably made out and with equal skill is painted the more sober and still more generous character of महाश्वेता and चंद्रापीड. The scenes in the last act where कादंबरी guards the body of चंद्रापीड becoming gradually instinct with life is executed with a masterely hand, the successive stages of returning life being marked with the attention of an artist. If well acted this scene will be quite ravishing in its effect.

"The whole composition displays experience and genius combined and will be admired as much for its literary purity as for its dramatic effect. The style is chaste and expressive. ......"

"स्पर्धेत उतरलेल्या ग्रंथांमध्ये 'असती चतुर' ही खूण असलेले हस्तलिखित पहिल्या क्रमांकास पात्र आहे. ... सर्वच दृश्यांची निवड आणि मांडणी सारासारविचारपूर्वक केली आहे; शेवटपर्यंत कुतूहल टिकून राहते. वर उल्लेखिलेल्या प्रणयदृश्यांनी पहिले तीन अंक व्यापले आहेत. कपिंजलाचे विरागी पावित्र्य आणि महाश्वेतेचा एकनिष्ठ निर्धार यांमुळे उदात्त बनलेल्या शोककथेचे पुढे काय होणार याच्या विचारात प्रेक्षकवर्ग तिसऱ्या अंकाच्या अखेरीस मग्न होऊन जातो. अच्छोद सरोवरापाशी आलेल्या चंद्रापीडाच्या प्रवेशाने चौथ्या अंकास सुरुवात होते. त्या सरोवराचे अतिशय गोड पण छोटेसे वर्णन करणारी पदे चंद्रापीडाच्या तोंडी घातली आहेत. दोन्ही नायक व नायिका यांच्यामधले प्रेम प्रथमदर्शनी उद्भवलेले असून त्यानंतर त्याची वाढ होते. असे असले तरी महाश्वेतेचे उदात्त गांभीर्य आणि कादंबरीचे लहान मुलासारखे अंतःकरणाचे निर्व्याजत्व ही दोन्ही सुस्पष्टपणे चित्रित केली आहेत. जन्माच्या विशिष्ट परिस्थितीमुळे आलेला पुंडरीकाचा दुबळेपणा फार चांगल्या रीतीने व्यक्तविला आहे. महाश्वेता आणि चंद्रापीड यांचा धीरगंभीर व त्यापेक्षाही उदार स्वभाव तितक्याच कौशल्याने रंगविला आहे. शेवटल्या अंकाच्या ज्या प्रवेशात चंद्रापीडाच्या शरीराचे कादंबरी रक्षण करीत असता चंद्रपीडाचे शरीर हळूहळू सचेतन होते, तो प्रवेश कसलेल्या हातातून उतरलेला आहे; चैतन्याचा संचार पायरीपायरीने होत असलेला कलाकाराच्या दक्षतेने चिन्हित केला आहे. चांगल्या अभिनयानिशी हा प्रवेश करून दाखविला तर प्रेक्षक भान विसरतील इतका परिणामकारक होईल.

"एकंदर रचनेमध्ये अनुभव आणि प्रतिभा या दोहोंचे संमीलन झालेले दिसून येते. वाङ्मयीन विशुद्धता आणि नाट्यपूर्णता या दोन्ही गुणांस्तव ती नावाजली जाईल. शैली निर्मळ आणि प्रसादपूर्ण आहे......"

परीक्षक जे कोणी असतील ते मर्मज्ञ आणि रसिक असले पाहिजेत. असे या अभिप्रायावरून वाटते. नाटकाचे व्यवस्थित समीक्षण केल्यानेच प्रस्तुत अभिप्राय कितपत समर्पक आहे याचे ज्ञान होणार आहे.

## २

गंधर्वलोकीची कथा. कैलासाच्या पायथ्याशी चित्ररथ गंधर्वाचे सुंदर वन आहे, त्याच्या मध्यभागी अच्छोद नावाचे निर्मल जलाचे सरोवर आहे. हंसनामक गंधर्वपतीची कन्यका महाश्वेता आपली आई गौरी हिच्यासह शिवपर्वणीच्या निमित्ताने अच्छोद सरोवरावर स्नानाला आली आहे. स्नान करून आपल्या चतुरिका व तरलिका या दासींसह वृक्षलतांचे सौंदर्य पाहात ती वनात हिंडत आहे. श्वेतकेतू मुनींचा मानसपुत्र पुंडरीक आपला जिवलग सखा कपिंजल याच्यासह पर्वकाळी कैलासावर शिवपूजा करावी या हेतूने स्वर्गलोकाहून उतरला आहे व तो या चित्ररथ वनाची शोभा पाहात हिंडत आहे. नंदनवन देवींने दिलेली दिव्य सुगंधाने युक्त असलेली कुसुममंजरी त्याच्या कानावर आहे. त्या सुगंधाने आकृष्ट होऊन महाश्वेता त्याच्याकडे येते. लतावृक्षांच्या आडून त्या अतिसुंदर युवकाला पाहताक्षणी तिचे मन त्याच्यावर जडते. काही वेळाने महाश्वेता पुंडरीकाच्या नजरेस पडते. त्या अतिधवलांगी लावण्यलतिकेला पाहताच पुंडरीक मोहित होतो. या मोहाला दूर सारण्याचे त्याचे सर्व प्रयत्न व्यर्थ होतात. तो तिला धरायला जातो इतक्यात कपिंजल तेथे येतो. तापसवृत्तीच्या मुनिकुमाराला हे शोभत नाही म्हणून तो पुंडरीकाची कडक शब्दांत कानउघाडणी करतो. पण पुंडरीक आपले मन आवरू शकत नाही. त्याची स्फटिकमाळ हातातून गळून पडते, ती महाश्वेता झेलते, हे त्याच्या लक्षात येत नाही. कपिंजलाने दरडावताच तो ओशाळतो व महाश्वेतेवर लटका राग दाखवितो. महाश्वेता स्फटिकमाळेऐवजी स्वतःचा मोत्याचा हार त्याच्या हातात टाकते ते त्याच्या लक्षात येत नाही इतका तो बेभान झाला आहे. कपिंजल त्याच्यावर संतापून निघून जातो. महाश्वेता आईने बोलावल्यावरून जाते व तिला हुडकीत पुंडरीक जातो. (अंक १)

दुसऱ्या अंकात या दोघा कामपीडितांची विव्हल स्थिती वर्णिली आहे. कपिंजल पुंडरीकाला रागाने बोलल्याबद्दल पस्तावून त्याला शोधीत येतो. सरोवराजवळील लतामंडपात तो मलूल होऊन पडलेला दिसतो. त्याला उपदेश करून काही उपयोग नाही असे पाहून महाश्वेतेला बोलावून आणावे अशा विचाराने तो निघून जातो. (अंक २, प्रवेश १). इकडे महाश्वेतेचीही मदनबाधेने तशीच अवस्था झाली आहे. पुंडरीकाने वल्कलाच्या तुकड्यावर प्रणयपत्रिका लिहून ती तरलिकेजवळ दिलेली असते. तरलिका ती महाश्वेतेला देते. ती वाचून महाश्वेता हरखते, इतक्यात कपिंजल तेथे उपस्थित होतो. कामसंतापाने पुंडरीकाची कशी दुर्धर अवस्था झाली आहे ते सांगून तिची विनवणी करून तो चालता होतो. मातापितरांना न सांगता एकदम प्रियकराकडे जाणे कितपत उचित होईल याचा महाश्वेता क्षणभर विचार करते. अखेर जाण्याचा निश्चय करून तरलिकेला घेऊन ती निघते. (अंक २ प्र. २).

पुंडरीक लतामंडपात तळमळत पडला आहे. चंद्रोदय झाल्यावर त्याचा संताप अधिक वाढतो. चंद्र आपले प्राण किरणांनी शोषीत आहे असे वाटून तो चंद्राला तुला 'मृत्युलोकात अनेक जन्म घ्यावे लागून काममुक्त न घेता तुला मरण पत्करावे लागेल.' असा शाप देतो. चंद्रही त्याला उलट शाप देतो, 'मला तू विनाकारण शापिलेस, तेव्हा तूही अनेक जन्म घेऊन माझ्यासह विरहदुःख भोगशील!' पुंडरीकाचे भान जाते. तो मरणोन्मुख होऊन पडतो. कपिंजल धावत येतो. 'महाश्वेते' म्हणून हाक मारीत त्याच्यासमोर पुंडरीक प्राण सोडतो. कपिंजलाचा शोक; महाश्वेतेचा दारुण विलाप. ती सहगमनाचा निश्चय करते. इतक्यात एक दिव्याकृती पुरुष आकाशातून खाली उतरतो, पुंडरीकाचे शव घेऊन आकाशात उडून जातो आणि तेथून

> आइके वत्से महाश्वेते। त्यागूं नको गे प्राणातें।
> कांहीं कालें स्वप्रियातें। पावशील तूं निर्धारें॥

असे आश्वासन देतो. या आश्वासनावर विश्वसून महाश्वेता प्राणत्यागाचा बेत सोडून देते. मात्र परत घरी न जाता ती तिथेच वसती करते. तिच्या सेवेला तरलिका तिच्याजवळ राहते. (अंक ३)

इथे नाटकाचा एक भाग संपतो. पुंडरीक-महाश्वेता यांची उपजताच शोकपर्यवसायी झालेली प्रणयकथा या भागात आली आहे. हे शोकपर्यवसान अखेरचे नव्हे, एवढा दिलासा मिळाला असल्यामुळे प्रेक्षकांचे कुतूहल टिकून राहते. इंदूरच्या परीक्षकांनी सूचित केल्याप्रमाणे पुंडरीकाची उतावळी कामवासना, म्हणजेच मनोदौर्बल्य, या नाट्यप्रसंगात ठळकपणे अभिव्यक्त झाले आहे. कामविकार उद्भवल्यानंतर त्याला दम निघत नाही. त्याच्या प्रेमाचा विषय झालेली महाश्वेता, तिचे धैर्य आणि प्रसंगावधान पुंडरीकाच्या तुलनेत सहजच उठून दिसते. वास्तविक पुंडरीकाला पाहून तीच अगोदर मोहित झाली. पण वागण्याबोलण्यात तिचे चातुर्य व प्रसंगावधान हरपत नाही. ती अधीरपणाने त्याला एकदम भेटत नाही, कपिंजलापाशी त्याची चौकशी करते,

त्याच्या हातातून गळलेली स्फटिकमाळ गुपचूप झेलते. या चोरीबद्दल पुंडरीक रागाने बोलतो तो राग लटका आहे हे ओळखून स्फटिकमाळेऐवजी मोत्यांचा हार त्याच्या हातात टाकते. आईने बोलावताच तेथून निघून जाते. वास्तविक तिचे प्रेम पुंडरीकाच्या प्रेमाइतकेच प्रबळ आहे. पण त्याबरोबरच तिचे धैर्य मोठे असल्यामुळे कामविकार तिचे तारतम्य, प्रसंगावधान, चातुर्य या गुणांना लोपवू शकत नाही. दुसऱ्या अंकात कपिंजलाने भेटून पुंडरीकाची स्थिती निवेदन केल्यानंतर शालीन कुलकन्यका या नात्याने काय करावे याचा तिला पेच पडतो. इथे तिची निर्णयशक्ती कसास लागते. योग्य तोच निर्णय घेण्यात तिचे मनोधैर्य दिसून येते. पुंडरीकाचे अवसान झाल्यानंतर संन्यस्त जीवन स्वीकारून तिथेच राहण्याचे ठरविण्यात पुन्हा तिचे धैर्य आणि निर्णयसामर्थ्य हे गुण प्रकट होतात.

या सर्व प्रसंगात कपिंजल प्रखर वैराग्यशील असा आपणांस दिसतो. पण त्याच्या प्रखरपणाखाली मित्रप्रेमाचा शीतल निर्झर वाहतो आहे. पुंडरीकाचे वर्तन त्याला पसंत नव्हते, तरी त्याचा कामसंताप आवाक्याबाहेर गेला आहे हे जाणून तो महाश्वेतेची भेट करवून त्याला वाचविण्याचा निकराचा प्रयत्न करतो. पुंडरीक मेल्यानंतरचा त्याचा शोक हृदयविदारक आहे.

व्यक्तींच्या या स्वभावरेषा बाणाच्या कादंबरीतच आहेत. एकंदर प्रसंग, त्या प्रसंगातले प्रत्येकाचे वागणे बोलणे मुळातलेच आहे. मूळ कादंबरीत ते महाश्वेतेने चंद्रापीडाला सांगितलेल्या वृत्तान्तात आणि अखेरीस कपिंजलाने महाश्वेतेला सांगितलेल्या वृत्तान्तात अप्रत्यक्ष कथनाच्या रूपाने आले आहे. एकंदर प्रसंग प्रत्यक्ष संवादाच्या रूपात घातला आणि बऱ्याच दीर्घ वर्णनातून मुख्य गोष्टींची निवड केली, हे चातुर्य अर्थात देवलांचे आहे.

## ३

शापसंभ्रमाचा दुसरा खंड म्हणजे चंद्रापीड कादंबरी यांचे प्रणयकथानक. हे अंक ४,५ यांत आले आहे. चौथा अंक दुव्यासारखा आहे. पाचव्या अंकात चंद्रापीड आणि कादंबरी यांची भेट होते. परस्पर प्रेमाचा उद्भव होऊन लगेच त्याचे दृढीकरण होते.

चवथ्या अंकाच्या पहिल्या प्रवेशात मध्यंतरी घडलेली हकीकत सांगण्याकरिता मुनिशिष्यांचा संवाद योजिला आहे. पुंडरीकाचे शव घेऊन जाणाऱ्या दिव्य पुरुषाच्या मागोमाग कपिंजल उडून जात असता वाटेत आकाशसंचारी ऋषीला त्याचा धक्का लागला. तेव्हा त्या ऋषीने 'मृत्युलोकी तू अश्व होशील' असा त्याला शाप दिला. पुंडरीकाच्या शापामुळे चंद्र उज्जयिनीचा सम्राट तारापीड व त्याची पत्नी विलासवती यांच्या पोटी चंद्रापीड नामे जन्मास आला. चंद्राच्या शापामुळे पुंडरीक तारापीडाचा मुख्य प्रधान शुकनास व त्याची पत्नी मनोरमा यांचा पुत्र म्हणून जन्मास आला. त्याचे नाव वैशंपायन ( या दोघांना पूर्वजन्माचे स्मरण नाही. ) कपिंजल चंद्रापीडाचा घोडा झाला. नाव इंद्रायुध. चंद्रापीड आणि वैशंपायन हे परस्परांचे जिवलग मित्र. दोघे सोळा वर्षांच्या वयात सर्व शास्त्रे, विद्या, कला यांत प्रवीण झाले, तेव्हा त्यांच्याबरोबर मोठे सैन्य देऊन तारापीडाने त्यांना दिग्विजयार्थ पाठविले. सर्व दिशा जिंकून उत्तरेस किन्नरांच्या प्रदेशात त्यांनी तळ ठोकला. तेथून एका अश्वमुखी जोडप्याच्या मागे लागून चंद्रापीड चित्ररथ वनामध्ये अच्छोद सरोवरानजीक येऊन पोचला. इतका कथाभाग शिष्यांच्या मुखाने निवेदन केला आहे. ( अंक ४, प्र. १ )

सरोवराच्या सौंदर्याने व जलमाधुर्याने हरखलेला चंद्रापीड गायनाच्या मधुर ध्वनीने आकृष्ट होऊन शिवालयात जातो. तिथे महाश्वेता श्रीशंकराचे भजन करीत होती. त्याला पाहताच ती बंधुभावाने त्याचे स्वागत करते. तो आपण कोण हे सांगतो. ती आपला जन्मापासूनचा वृत्तान्त सांगते. पुंडरीकभेटीपर्यंत येताच तिला दुःखावेग अनावर होतो. तिथे खंड पाडून प्रवेश संपविला आहे. ( अंक ४, प्र. २ ). पुंडरीकाच्या भेटीपासून त्याच्या दारुण मृत्यूपर्यंतचा वृत्तान्त अंक १ ते ३ यांत दृश्यरूपाने आलेला असल्यामुळे तो इथे अर्थातच गाळला आहे. पुढील प्रवेशात सहगमनाच्या चालीविरुद्ध चंद्रापीडाने केलेले व्याख्यान संवादरूपाने आले आहे. नंतर प्रसंगाने महाश्वेता चंद्रापीडाला आपली जिवलग सखी कादंबरी हिची हकीकत सांगते. गंधर्वांचा अधिपती चित्ररथ आणि त्याची पत्नी मदिरा यांची कादंबरी ही एकुलती एक मुलगी. महाश्वेता दुःखात आहे तोपर्यंत मी लग्न करणार नाही असा ती निश्चय करून बसली आहे. त्यापासून तिला परावृत्त करण्यासाठी महाश्वेता दुसऱ्या दिवशी सकाळी जाणार आहे. चंद्रापीडाला आपल्याबरोबर येण्याची ती विनंती करते. तो रुकार देतो. ( अंक ४ प्र. ३ ).

पाचवा अंक हा चंद्रापीड आणि कादंबरी यांच्यामधील प्रेमोद्भव चित्रित करणारा अंक. पहिला प्रवेश म्हणजे प्रयोगाच्या दृष्टीने दोन तीन प्रवेश आहेत. प्रयोगात ते तसेच दाखवीत असले पाहिजेत. प्रथम कादंबरी व महाश्वेता यांची भेट. एकमेकींची थट्टामस्करी. कादंबरी टोचून बोलते. महाश्वेता ते थट्टेवारी नेते. नंतर तरलिकेबरोबर चंद्रापीड येतो. कादंबरीच्या आणि त्याच्या भेटीत प्रथमदर्शनीच दोघांच्या मनात प्रेमोद्भव होतो. कादंबरी तांबूल देते, तेव्हा करस्पर्श होऊन अनुरागाची वृद्धी होते (अंक ५ प्र. १) कादंबरीच्या अंतःपुराजवळ क्रीडापर्वतावरील मणिमंदिरात चंद्रपीडाची राहण्याची व्यवस्था केली आहे. कादंबरीकडे सगळे चित्त लागले असता तारापीडाकडून आलेले पत्र घेऊन केयूरकासह पत्रलेखा येते. घर सोडून फार दिवस झाले असल्यामुळे तारापीडाने चंद्रापीडाला सत्वर परत बोलाविले आहे. कादंबरीची भेट घेऊन वाह्यतः तरी तिची अनुज्ञा घेऊन चंद्रापीड तेथून निघतो. कादंबरीची मदनबाधेने विव्हल अवस्था झाली आहे. चंद्रापीडाची तशीच. (अंक ५ प्र. २,३.)

पुंडरीक-महाश्वेतेचा प्रेमप्रसंग चित्रित करणाऱ्या पहिल्या तीन अंकांच्या मानाने कादंबरी-चंद्रापीडाच्या प्रेमबंधनाचा हा भाग (अंक ४, ५) फिका वाटतो. पुंडरीक-महाश्वेतेच्या प्रेमप्रसंगामध्ये अद्भुतता आहे, आकस्मिकता आहे, उत्कटता आहे आणि तीव्र कारुण्य आहे. अच्छोद सरोवराच्या काठचे ते अद्भुतरम्य अरण्य, त्यात स्वर्गाहून उतरलेला पुंडरीक आणि गंधर्वकन्या महाश्वेता यांची अचानक आकस्मिक भेट, पुंडरीकाची अतिप्रबळ कामवासना आणि तिच्यात त्याचा दारुण अंत! सर्वच गोष्टी अत्यंत परिणामकारक नाट्य डोळ्यांसमोर उभे करतात. पुंडरीकाची उतावळी कामवासना त्याच्या चारित्र्याला कमीपणा आणणारी असेल, पण ती उत्कट नाट्य निर्माण करते.

चंद्रापीड-कादंबरीच्या प्रेम प्रकरणामध्ये योजनाबद्धता आहे. महाश्वेता कादंबरीला लग्न करण्याचा आग्रह करीत होती. चंद्रापीड हा आयता उत्तम वर चालून आला म्हणून त्याला ती मुद्दाम कादंबरीच्या भेटीला घेऊन गेली. तिची युक्ती सफल झाली; पण या योजकतेमुळे त्या प्रसंगातले कुतूहलजनकत्व निम्म्याने कमी झाले. त्यांच्या भेटीचे स्थळ कादंबरीचा महाल हे देखील मामुली. सरोवराकाठच्या वनप्रदेशासारखी अद्भुतरम्यता इथे नाही. पुंडरीकाची कामोत्कटता इथे नाही व त्याच्या मृत्यूचे कारुण्य नाही. चंद्रापीड प्रथम संशयात घोटाळतो, नंतर मदनबाधेने तळमळतो; पण वडिलांचे पत्र येताच मन आवरून, कादंबरीचा निरोप घेऊन निघतो. साधारण दहाजणांसारखे, पण किंचित उंचावलेले याचे प्रेमप्रकरण आहे. म्हणून नाट्यदृष्ट्या ते फिके पडते. पुंडरीक महाश्वेतेच्या कानावर मंजरी ठेवतो, तर कादंबरी चंद्रापीडाला तांबूल देते. अशी काही साम्यस्थळे आहेत, पण त्यामुळे मागून येणाऱ्या प्रणयकथेचा रंग उतरतो.

या सर्व कारणांमुळे ४, ५ हे दोन अंक रंगभूमीवर कंटाळवाणे होत असले पाहिजेत. "प्रत्यक्ष रंगभूमीवर चौथ्या अंकापासून प्रयोग कंटाळवाणा होऊ लागतो आणि शेवटी शेवटी तर नटवर्गाप्रमाणे प्रेक्षकवर्गही डुलक्या घेऊ लागण्याच्या बेतात येतो." नाटकाचा प्रयोग पाहिलेल्या रसिक विद्वानांनी अशी साक्ष दिली आहे.

लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट ही की हे दोन अंक कादंबरीच्या प्रेमप्रकरणाला वाहिलेले असूनही यात महाश्वेतेचीच भूमिका अधिकाधिक खुलत जाते. तिच्या व्यक्तित्वाचे एकेक पैलू उजेडात येतात. उत्कट प्रेमिका आणि महापतिव्रता ही तिच्या व्यक्तित्वाची दोन अंगे पूर्वी प्रकट झाली होती. चौथ्या अंकात प्रियकराची स्मरणी ओढणारे प्रशांत वैराग्य आणि चंद्रापीडाला पाहून उत्पन्न झालेले सहज निर्मल बंधुप्रेम हे तिचे गुण प्रकट होतात. कादंबरीच्या लग्नासाठी प्रयत्न करण्यात दिसून आलेले निर्व्याज सखीप्रेम, योजकतेचे चातुर्य आणि संवादातून दिसून येणारी प्रसन्नता, विनोदप्रियता, या एकामागून एक प्रकट होणाऱ्या गुणांनी महाश्वेतेचे व्यक्तित्व आपणांस अधिकाधिक हृदयंगम भासू लागते. पाचव्या अंकातील संवाद तिच्या चतुरतेने, विनोदीपणाने उजळले आहेत.

सहाव्या अंकात वैशंपायन आणि महाश्वेता यांचा प्रसंग आहे. चंद्रापीड एकटाच निघून गेल्यानंतर दिग्विजयाकरिता आणलेल्या सैन्याचा तळ उठवून वैशंपायन काही थोड्या लोकांसह अच्छोद सरोवरापाशी एक दिवसाकरिता म्हणून थांबतो. सरोवराकाठच्या त्या लतामंडपापाशी येताच तिथे तो खिळल्यासारखा होतो. काही तरी हरवले आहे असे वाटून सारखा शोधीत राहतो. कितीही विनवण्या केल्या तरी तो निघत नाही असे पाहून बरोबरचे मांडलिक

व इतर लोक उज्जयिनीला परततात. कादंबरीचा निरोप घेऊन परतलेली महाश्वेता लतामंडपापाशी आलेली दिसताच हीच आपली हरवलेली वस्तू असे भान होऊन वैशंपायन तिच्या पाठीस लागतो. ( प्र. १ ). उज्जयिनीहून त्याच्या शोधार्थ निघालेला चंद्रापीड तेथे येऊन पोचतो. वैशंपायन गुहेत राहणाऱ्या तपस्विनीचा–महाश्वेतेचा–पिच्छा पुरवतो आहे असे त्याला सेवकांकडून कळते. (प्र. २) वैशंपायनाने महाश्वेतेचा सारखा ध्यास घेतला आहे. ती अनुकूल होऊन आपल्याजवळ आली आहे असा स्वप्नामध्ये भास होऊन तो रात्रीचा भटकू लागला आहे. महाश्वेता समजून काटेरी वेलीला आलिंगन देतो व काटे बोचताच भानावर येतो. महाश्वेतेच्या गुहेकडे जातो. महाश्वेता शिलातलावर पडली आहे असे पाहून तिच्याशी अतिप्रसंग करण्याचा प्रयत्न करतो. काहीकेल्या तो ऐकत नाही असे पाहून ' अधमा, पाप्या, तुला शुकयोनी प्राप्त होवो ' असा ती शाप देते. तत्काळ तो पडून त्याची राख होते. इतक्यात चंद्रापीड प्रवेश करतो. आपल्या मित्राची अशी अवस्था झालेली पाहून धाडकन पडून त्याचा प्राण जातो. महाश्वेता पुनः दुःखसागरात मग्न होते. ( अंक ६, प्र. ३. )

पुंडरीकाच्या प्रेमप्रसंगाची इथे पुनरावृत्ती झाली आहे हे सहज दिसून येण्याजोगे आहे. पुंडरीकाचा दुसरा जन्म म्हणजे वैशंपायन. तीच अनावर वासना, तीच उतावळी! तथापि निराळेपणा पुष्कळच आहे. वैशंपायन भ्रमिष्टासारखा भ्रमण करतो. पूर्वजन्मीची आठवण तर नाही, पण अंधुकसा आभास मात्र आहे, त्याचे स्वरूप काय हे त्यालाच समजत नाही. अशा विलक्षण अवस्थेतल्या माणसाचा चांगला अभिनय करणे हे सामान्य काम नाही. समर्थ नटाने नीट समजून घेऊन जर वैशंपायनाची भूमिका केली तर शाप-संभ्रमाचा सहावा अंक ही मराठी नाट्यसृष्टीतली एक अद्भुत करामत ठरेल. वैशंपायनाला प्रतियोगी महाश्वेता आहे. तिच्या व्यक्तित्वाचे आणखी काही पैलू इथे प्रकट होतात : दुर्दान्त निश्चय आणि प्रखर तेज. उत्तम जाणत्या नटांच्या हाती हा अंक पडेल तर ते त्याचे सोने करून दाखवितील. सामान्य नटांच्या हाती ती कंटाळवाणी पुनरुक्ती ठरेल.

सातवा अंक म्हणजे सर्व कथेची गुंडाळणी व समारोप. पहिल्या प्रवेशात कपिंजल मंदारक नामक शिष्याला पुढे काय काय घडले हे सांगतो. चंद्रापीडाचा मृत्यू पाहून महाश्वेता दुःखाने करपून जाऊन सरोवरात उडी टाकण्याकरिता निघाली. इतक्यात पत्रलेखेसह कादंबरी तिथे येऊन पोचली. इंद्रायुध अश्व आणि पत्रलेखा यांनी सरोवरात उड्या टाकल्या. इंद्रायुधाचा कपिंजल झाला व पत्रलेखा ही मूळची रोहिणी, ती चंद्रलोकी गेली. इकडे आकाशवाणी झाली की ' कादंबरी, महाश्वेते, तुमचे दोघींचे हेतू पूर्ण होतील. तरी तुम्ही चंद्रापीडाच्या शरीराचे नीट रक्षण करा. ते शापापासून मुक्त झाले आहे, ते लवकरच सजीव होईल.' तेव्हा चंद्रपीडाच्या शरीराचे रक्षण करीत दोघी तिथेच राहिल्या. चंद्रापीड व वैशंपायन हे पुढच्या जन्मी अनुक्रमे शूद्रक राजा व शुक पक्षी झाले. शुक पुष्कळ हालअपेष्टा सोसून जाबालीच्या आश्रमात गेला आहे. त्याची म्हणजे पुंडरीकाची शापापासून लवकरच मुक्तता व्हावी म्हणून श्वेतकेतू मुनींनी काही मंत्रविधी चालविला आहे. त्याची मुक्तता होऊन तो लवकरच प्रकट होईल. अशी सगळी हकीकत कपिंजल सांगतो ( प्र. १ ). त्यानंतर चंद्रापीडाचे शरीर पुष्पशय्येवर ठेवले आहे व जवळच कादंबरी व तिची सखी मदलेखा बोलत आहेत असा प्रवेश. कादंबरी चिंताग्रस्त आहे पण चंद्रापीडाचे शरीर थोडे थोडे सतेज होत चालले असे दिसत असल्यामुळे ती आशा बाळगून आहे. इतक्यात इकडील अनर्थाची वार्ता कळून भेटीसाठी निघालेले तारापीड व विलासवती प्रवेश करितात. विलासवतीचा शोक. तारापीड राज्य सोडून देऊन वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याचा निश्चय प्रकट करतो ( प्र. २ ). तिसरा व शेवटचा प्रवेश. चंद्रापीडाच्या शरीराला पर्यंकावर बसविले आहे व कामदेव म्हणून त्याची पूजा बांधली आहे. कादंबरी व मदलेखा बोलत आहेत. कादंबरी चंद्रापीडाच्या शरीराला अधिकाधिक स्पर्श करते तसतसे ते अधिकाधिक सतेज होते. अखेर ती आलिंगन देते तेव्हा चंद्रापीड पूर्ण सजीव होतो. त्याच वेळी तिकडे पुंडरीक चंद्रलोकातून उतरून महाश्वेतेला भेटतो. ते दोघे इकडे येतात, कपिंजलाला घेऊन तरलिका येते. जवळच आश्रम करून राहिलेले तारापीड, विलासवती, शुकनास, मनोरमा येतात. श्वेतकेतू मुनींच्या सांगण्यावरून शुकनास, मनोरमा पुंडरीकाचा आपला पुत्र म्हणून स्वीकार करतात. चित्ररथ व हंस येतात. आपल्या गंधर्वनगरीत दोन्ही लग्नसमारंभ साजरे करण्याचा संकल्प चित्ररथ जाहीर करतो. शेवट गोड होतो ( प्र. ३ ).

इंदूर परीक्षकांनी शेवटच्या प्रवेशाची फार प्रशंसा केली आहे. चंद्रापीडशरीरात " चैतन्याचा संचार पायरी पायरीने होत असलेला कलाकाराच्या दक्षतेने चिन्हित

केला आहे." असे त्यांनी म्हटले आहे. इंदूरला पाठविलेले हस्तलिखित आणि मुद्रित आवृत्ती यांच्यांत इथे काही फरक असेल तर न जाणो; पण पायरीपायरीने चैतन्याचा संचार होत असलेला मुद्रित आवृत्तीत सूचित केलेला दिसत नाही. प्रत्यक्ष प्रयोगात अशा रीतीने चैतन्य-संचार होत असलेला दाखविणे फार कठीण म्हणून प्रयोगा-करिता देवलांनी इथे कदाचित बदल केला असेल.

हे एक दृश्य वगळले तर बाकीचा सर्व अंक प्रयोगात कंटाळवाणा होईल—होत असला पाहिजे. कथासूत्राची गुंडाळणी आणि सर्वांचा गोड शेवट, हाच काय तो उर्वरित भाग. तो कंटाळवाणा झाल्याखेरीज कसा राहणार?

## ४

शापसंभ्रम नाटकाची रूपरेषा याप्रमाणे पाहिल्यानंतर चित्रविचित्र सौंदर्याने नटलेल्या कादंबरीरूपी विशाल प्रस्तरा-तून ती कशी कोरून काढली आहे हे पाहणे उद्बोधक होईल. कांद्याला जसे पापुद्रे असतात तशी बाणाची कादंबरी अनेक पुटांची बनलेली आहे. शेवटचे पुट म्हणजे चंद्रापीड व पुंडरीक यांचा शेवटचा जन्म. तिथून प्रारंभ करून कथाकार पूर्वीच्या जन्मांकडे वळला आहे. अंतिम निवेदनकर्ता कवी बाणभट्ट हाच. विदिशा नगरीचा महावैभवशाली राजा शूद्रक याच्या वर्णनापासून बाणाने आपल्या कथेला आरंभ केला आहे. एके दिवशी राजा दरबारात बसलेला असताना एक चाण्डालकन्यका सोन्याच्या पिंजऱ्यात बद्ध केलेल्या पोपटाला घेऊन येते. तिचा सेवक त्या पिंजऱ्याला राजाच्या पायाशी ठेवून "हा शुक पक्षी मनुष्यवाणीने बोलू शकतो. सर्व वेद, शास्त्रे, विद्या, कला यांत हा प्रवीण आहे" असे सांगतो. इतक्यात तो शुक राजाच्या प्रशस्तिपर स्वरचित कविता म्हणून राजाला अभिवादन करतो. हा अद्भुत प्रकार पाहून राजा त्याला आपली हकीकत सांगण्याविषयी आग्रह करतो.

इथून पुढे शुकाचे निवेदन, म्हणजे कथेचे दुसरे पुट सुरू होते. आपण पंख न फुटलेल्या लहान पिल्लाच्या अवस्थेत पित्याच्या पंखाखाली असताना एका शबर जातीच्या निर्दय म्हाताऱ्याने वृक्षावरून त्याला खाली कसे फेकले, तहानेने व्याकूळ होऊन तळ्याकडे जात असता जाबाली ऋषींचा पुत्र हारीत याने आपल्याला पाणी देऊन मायेने जाबाली ऋषींच्या आश्रमात कसे नेले, हे सर्व त्या शुकाने सांगि-तले. या शुकशावकाकडे निरखून पाहून जाबाली ऋषी उद्गारले, "हा जीव पूर्व जन्मातील दुष्कर्माचे फळ उप-भोगतो आहे." जाबाली ऋषी त्रिकालज्ञ होते. भोवताली जमलेल्या मुनिशिष्यांनी त्यांच्या या उद्गारामागील रहस्य सांगण्याविषयी त्यांना विनंती केली. जाबाली ऋषी म्हणाले ठीक आहे, पूर्वजन्मीचा वृत्तान्त ऐकून याला (मला पोपटाला) देखील पूर्वजन्मांची स्मृती होईल; असे म्हणून त्यांनी ती प्रदीर्घ कथा सांगण्यास सुरुवात केली.

इथून पुढे कथेचे तिसरे सर्वांत मुख्य व मोठे पुट सुरू होते. जाबालींनी आपल्या शिष्यांना सांगितलेली हकीकत शुक ऐकतो व शूद्रकाच्या दरबारात पुनः कथन करतो.

उज्जयिनी नगरीत तारापीड नावाचा राजा राज्य करीत होता. त्याची राणी विलासवती. त्याचा मुख्य प्रधान शुकनास व त्याची पत्नी मनोरमा. दोन्ही जोडप्यांना सर्व काही सुखे होती. प्रजा संपन्न व संतुष्ट होती. फक्त एकच उणीव होती. पोटी संतान नव्हते. दोन्ही जोडपी त्यामुळे फार काळ दुःखीकष्टी होती. एके दिवशी रात्री तारापीड महाराजांना असे स्वप्न पडले की राणी विलासवतीच्या देहात पूर्णचंद्र प्रवेश करीत आहे. त्याच वेळी शुकनासाला स्वप्न पडले की मनोरमेच्या शरीरात पुंडरीकाने (शुभ्र कमलाने) प्रवेश केला आहे. थोड्या दिवसांत दोघींना गर्भ राहिले. सर्वांना हर्ष झाला. योग्य काली दोघी प्रसूत झाल्या. आनंदीआनंद झाला, राजपुत्राचे नाव ठेवले चंद्रापीड. प्रधानपुत्राचे ठेवले वैशंपायन. दिसामासांनी वाढून दोघे कुमारवयाला प्राप्त झाले. राजाने त्यांच्या शिक्षणा-करिता स्वतंत्र व्यवस्था केली. दोघे सर्व विद्या, कला, शास्त्रे यांत प्रवीण झाले. दोघे एकमेकांचे जिवलग मित्र बनले. राजाने त्यांना दिग्विजयाला पाठविण्याचा बेत केला. शुकनासाने त्यांना धर्म, राजनीती इत्यादी विषयांना धरून सुंदर बोध केला. इंद्रायुध नावाचा एक अद्भुत अश्व चंद्रापीडाला बसण्याकरिता देण्यात आला. कुलूत देशाच्या राजाची कन्या–पत्रलेखा नावाची–ते राज्य जिंकल्यानंतर विलासवतीने पाळली होती. तो चंद्रापीडाच्या सोबतीला देण्यात आली. बरोबर मोठे सैन्य घेऊन ते दोघे मित्र दिग्वि-जयार्थ निघाले. 'प्राची प्रतीची दक्षिणोत्तरा' अशा क्रमाने दिग्विजय करून उत्तरेकडील किरातांची राजधानी सुवर्णपूर नावाची त्यांनी जिंकली व परत फिरण्यापूर्वी काही दिवस तेथे तळ दिला.

एक दिवस सहज शिकार करण्याकरिता म्हणून इंद्रायुधावर स्वार होऊन चंद्रापीड शिबिराबाहेर पडला, तो किन्नरांच्या एका जोडप्याच्या मागे लागून खूप दूर गेला. घोडा व स्वार दोघे थकले. पाण्याच्या शोधार्थ माग काढीत ते अतिसुंदर सरोवरापाशी येऊन पोचले. हेच अच्छोद सरोवर. 'कादंबरी'तील महत्त्वाच्या घटनांचे स्थान हेच. चित्ररथ गंधर्वाने लावलेल्या नाना वृक्षलतांनी शोभविलेल्या चित्ररथ वनाच्या मध्यभागी हे अतिनिर्मल जलाचे निसर्गरमणीय सरोवर होते. इन्द्रायुधाला चरायला सोडून देऊन चंद्रापीड त्या सरोवराच्या काठी घटकाभर विसावला.

मजकुराच्या दृष्टीने पाहिले असता संपूर्ण 'कादंबरी'-चा एकतृतीयांश भाग इथपर्यंत होऊन जातो. जुन्या पद्धतीने 'व्युत्पत्ति' (काव्यनाटकादी ललित ग्रंथ) शिकविणारे शास्त्रीपंडित कादंबरीचा एवढाच (महाश्वेता दर्शनापर्यंतचा) भाग विद्यार्थ्यांना पढवीत असत.

चंद्रापीड अच्छोद सरोवरावर विसावला असता दिव्य गायनाचे श्रुतिमधुर आलाप त्याच्या कानी पडले. इंद्रायुध कान ताठ करून स्तब्ध झाला यावरून त्याच्यादेखील कानावर तो आवाज पडत होता असे दिसले. त्याच्यावर स्वार होऊन चंद्रापीड आवाजाच्या रोखाने निघाला तो एका शिवालयापाशी येऊन पोचला. तेथे एक अतिधवलांगी तरुणी शिवमूर्तीपुढे गात होती. गाणे संपल्यानंतर तिने त्याला पाहिले. 'कोण? काय? या गंधर्वलोकात कसा आलास?' अशी पृच्छा केली व त्याची हकीकत समजून घेतल्यानंतर त्याचे कंदफळांनी आतिथ्य केले. निर्जन वनात एकटीच राहून ईश्वरोपासना करणाऱ्या या दिव्यशरीरी तरुणीबद्दल चंद्रापीडाला दसपट कुतूहल होते. त्याने तिला तिचा वृत्तान्त विचारताच ती शोकमग्न झाली. पण थोड्या वेळाने तिने आपली जीवनकहाणी सांगण्यास आरंभ केला.

इथून पुढे कथानिवेदनाचे चौथे पुट सुरू होते. महाश्वेता आपली जीवनकथा सांगते. चंद्रापीडाला भेटलेली धवलांगी महाश्वेता होती, हे सांगावयास नकोच. तिने जे सांगितले ते अंतर्ज्ञानाने जाणून जाबाली ऋषी निवेदन करतात. (हे तिसरे पुट.) त्यांच्यापासून ऐकून शुक शूद्रक राजाच्या दरबारात एकंदर वृत्तान्त कथन करतो (हे दुसरे पुट). आणि शूद्रकाच्या दरबारासकट सगळी हकीकत वाणभट्ट आपल्या काव्यमय वाणीने वर्णितो (हे पहिले पुट).

आपल्या मातापितरांची–हंस व गौरी यांची–पूर्वपीठिका सांगितल्यानंतर महाश्वेतेने अच्छोद सरोवरावर ती स्नानाला आली असता, पुंडरीकाची व तिची दृष्टभेट कशी झाली, दोघांच्याही मनात प्रथमदर्शनी प्रेमोद्भव कसा झाला, मदनव्यथेने पुंडरीकाचा संताप कसा झाला व कपिंजलाने त्याची दुर्धर अवस्था कथन केल्यानंतर ती तरलिकेसह पुंडरीकापाशी येऊन पोचण्याच्या अगोदर त्याचे प्राणोत्क्रमण कसे झाले, हा सर्व वृत्तान्त चंद्रापीडाला निवेदन केला. त्या गोष्टींच्या स्मृतीने तिचा शोक इतका अनावर झाला की ती मूर्च्छित झाली. थोड्या वेळाने सावध झाल्यानंतर, आपण पुंडरीकाबरोबर सहगमनाचा निश्चय करतो आहो इतक्यात एक दिव्य पुरुष आकाशातून खाली उतरून पुंडरीकाचा देह उचलून घेऊन पुन्हा आकाशमार्गाने कसा गेला, जाता जाता त्याने धीरगंभीर आवाजाने 'वत्से महाश्वेते, प्राणत्याग करू नकोस, तुझे आणि पुंडरीकाचे कालांतराने मीलन होणार आहे' असे आश्वासन कसे दिले, त्या दिव्य पुरुषाच्या मागोमाग कपिंजल कसा उडून गेला, इत्यादी उरलेला वृत्तान्त महाश्वेतेने निवेदन केला आणि शेवटी ती म्हणाली, "हे सगळे काय झाले, कसे झाले, मला काही कळत नाही. त्या दिव्य पुरुषाच्या वाणीने जो आशातंतू उत्पन्न केला त्याच्या आधारावर मी हे भयाण जीवन कंठीत आजवर जगले आहे.

महाश्वेतेचे निवेदन, म्हणजे चौथे पुट, येथे संपले. खरे म्हटले तर चौथ्या पुटाचे अनेक भाग आहेत. महाश्वेतेचे आणखी लहानसे निवेदन, वैशंपायनासंबंधीचे, पुढे आहे. शेवटी कपिंजलाचे एक वृत्तान्तनिवेदन आहे. या व्यक्तींनी या हकीकती सांगितल्या असे जाबालींनी सांगितले. म्हणून ही निवेदने चौथ्या पुटाचे अंश होत, असे ठरते.

'कादंबरी'चा एथपर्यंतचा कथाभाग म्हणजे शापसंभ्रम नाटकाचे चार अंक होत. पुंडरीक महाश्वेतेचे शोकपर्यवसायी प्रणयकथानक शापसंभ्रमाचे पहिले तीन अंक व्यापते. किन्नरमिथुनाच्या मागे लागून चंद्रापीड अच्छोद सरोवरापाशी येतो व महाश्वेतेची त्याची भेट होऊन महाश्वेता आपला वृत्तान्त कथन करते, हा भाग नाटकाच्या चौथ्या अंकात येतो. यात दोन धोरणे अमलात आणलेली दिसतात. नाटकामध्ये दृश्य प्रसंग घटनांच्या कालक्रमानेच आणले पाहिजेत. मागचा वृत्तान्त पूर्ववृत्तदर्शनाच्या (flash back) पद्धतीने दाखविणे हे सिनेमाचे तंत्र. अगदी अलीकडे ते नाटकात आणण्याचे प्रयत्न होत असले तरी पूर्वी त्याचा मागमूस नव्हता. कादंबरीच्या एकंदर कथानकातली आरंभीची घटना पुंडरीक-महाश्वेता यांचा प्रणय ही

होय. मदनबाधा चंद्रप्रकाशामुळे असह्य होऊ लागली तेव्हा पुंडरीक चंद्राला शाप देतो. चंद्रही पुंडरीकाला शाप देतो. त्यानंतर शापप्रभावाने चंद्र व पुंडरीक अनुक्रमे तारापीड व शुकनास यांच्या पोटी चंद्रापीड व वैशंपायन या नावांनी जन्म घेतात. चंद्रापीड अच्छोद सरोवराच्या काठी येतो तेव्हा वीस वर्षांचा असतो. महाश्वेता कादंबरी या गंधर्व कुलातल्या असल्यामुळे त्यांचे तारुण्य या अवधीत कमी होत नाही. याचा उल्लेख मूळ ग्रंथात व शापसंभ्रम नाटकात मुद्दाम केला आहे. तात्पर्य, शापसंभ्रमाच्या पहिल्या तीन अंकांतील घटनांनंतर वीस वर्षांनी चौथ्या अंकातील प्रसंग घडला आहे.

घटनेच्या कालक्रमानुसार प्रसंग दाखविणे हे एक धोरण. दुसरे धोरण म्हणजे नाटकाकरिता रसोत्कट प्रसंगाची निवड करणे. नाटककाराने याच धोरणाने पुंडरीक-महाश्वेता प्रणयप्रसंगाची निवड केली. अगोदरच शृंगार हा रसराज मानलेला. नाटकाच्या प्रेक्षकांना तर तो हमखास तसा वाटणारा. त्यातून उत्कट विप्रलंभ म्हणजे अधिकच रसिकग्राह्य. तेव्हा येथपर्यंतच्या 'कादंबरी'च्या विस्तृत कथानकातील नेमका एवढाच भाग उचलून तो देवलांनी नाट्यरूपाने दाखविला आणि बाकीचा भाग फोलकट म्हणून वर्ज्य केला, यात त्यांचा नाट्यविषयक धोरणीपणा दिसून येतो. वस्तुतः 'कादंबरी'चा बाकीचा भागदेखील काव्य-दृष्ट्या मनोरम आहे. पण तो विस्कळित पसारा नाटकात बसण्याजोगा नाही, हे त्यांनी हेरले आणि आपल्या नाट्य-दृष्टीचा प्रत्यय दिला.

चंद्रापीड महाश्वेता भेटीच्या चौथ्या अंकात रसप्रकर्ष नाही. एक प्रकारचे शांत नाट्य याही अंकात आहे. पण ते सामान्य प्रेक्षकांचे चित्त वेधील असे नाही. प्रियजनाप्रीत्यर्थ प्राणत्याग करण्याच्या प्रवृत्तीविरुद्ध, चंद्रापीडाने महाश्वेतेला जो बोध केला तो मुळात विस्तृत व सुंदर आहे. तो देवलांनी बऱ्याच चांगल्या रीतीने 'शापसंभ्रमा'त उतरला आहे. (अंक ४, प्र. ३) याच्या संबंधाने श्री. कृ. कोल्हटकर आपल्या टीकालेखात म्हणतात, "त्याप्रमाणेच मूळ कादंबरीत जेथे लांबच लांब भाषणे होती, तेथे त्यांच्यामध्ये अनेक प्रश्न घालून त्यांना (देवलांनी) नाटकाई केले आहे. उदाहरणार्थ, महाश्वेतेस चंद्रापीडाने केलेला उपदेश व तिचे सांत्वन."

## ५

मूळ 'कादंबरी'च्या कथानकाचा धागा पुन्हा हाती घेऊ. इथून कादंबरीदर्शनाच्या प्रसंगाकडे कथानक वळविले आहे. रात्री झोप येत नाही, तेव्हा चंद्रापीड 'हे भगवति, तुझ्या दुःखाची सोबतीण तरलिका म्हणून तू जी सांगितलीस, ती कुठे गेली बरे?' असे महाश्वेतेला विचारतो. तेव्हा महाश्वेता आपली जिवलग मैत्रीण कादंबरी हिची माहिती करून देते व सांगते की, 'महाश्वेतेचे दुःख जोपर्यंत कायम आहे तोपर्यंत मी लग्न करणार नाही' अशी प्रतिज्ञा कादंबरीने केली आहे, म्हणून तिचे आईबाप चिंतेत पडले आहेत. तेव्हा 'आईबापांचे मन तू मोडू नको' अशी तिची विनवणी करण्याकरिता मी तरलिकेला तिच्याकडे पाठविले आहे. हे सांगितल्यानंतर महाश्वेता झोपी जाते; ऐकलेल्या गोष्टीच्या विचारामुळे चंद्रापीड सारी रात्र जागून काढतो. सकाळी तरलिका येते व कादंबरी आपल्या निश्चया-पासून ढळत नाही, असे सांगते. तेव्हा मनाशी बराच विचार करून महाश्वेता स्वतः कादंबरीकडे जाण्याचा बेत करते व चंद्रापीडाला बरोबर येण्याची विनंती करते. चंद्रापीड संमती देतो.

कथानकाचा ओघ कादंबरीकडे वळविण्यासाठी बाण-भट्टाने केलेली ही योजना कृत्रिम भासते. तरलिका ही बोलूनचालून दासी; तिला लक्षात ठेवून मुद्दाम तिच्या-बद्दल चंद्रापीडाने चौकशी करणे हे अस्वाभाविक होय. देवलांनी हा कृत्रिम प्रकार काढून टाकून चंद्रापीड व महाश्वेता प्राणत्यागाच्या प्रवृत्तीसंबंधाने बोलत असता तरलिका (केयूरकासह) तिथे येते असे दाखविले आहे. त्यांनी दुवा सहजसुंदर रीतीने जुळविला आहे. पुढे काद-बरीची माहिती, तिचा लग्न न करण्याचा निश्चय, वगैरे सर्व गोष्टी त्यांनी मुळाप्रमाणेच आणल्या आहेत.

महाश्वेता आणि चंद्रापीड कादंबरीला भेटण्याकरिता हेमकूटावर कादंबरीच्या महालात येतात, चंद्रापीड आणि कादंबरी यांच्या मनात प्रथमदर्शनी परस्परांविषयी प्रेमाचा उद्भव होतो, कादंबरी तांबूल देते तेव्हा एकमेकांच्या हस्तस्पर्शाने अनुराग अधिक दृढ होतो, इत्यादी सर्व गोष्टी मुळातल्या प्रमाणेच शापसंभ्रमात वर्णिल्या आहेत. काव्यमय वर्णनांची संधी साधण्यासाठी मूळ कादंबरीत आणलेल्या गोष्टी, म्हणजे नाना प्रकारच्या कलाकुसरींमध्ये गढलेल्या कादंबरीच्या दासींचा समुदाय, तसेच कालिंदी, सारिका आणि

परिहास शुक यांचा कलह असले भरताड नाटकामध्ये शोभण्याजोगे नाही, तरी ते मुळाच्या अनुसरणासाठी देवलांनी आपल्या रचनेत गुंफून दिले आहे. "तू वनात राहून दुःख भोगीत असता मी सुखात राहते म्हणून, तू लग्न करून घे, असा मर्मभेदक निरोप मला पाठविलास" असा टोमणा कादंबरी महाश्वेतेला देते, त्या प्रसंगीच्या दोघी जिवलग मैत्रिणींचा संवाद खटकेबाज आहे. तो देवलांच्या चातुर्याचा निदर्शक आहे. मुळाला अनुसरण्याची जबाबदारी आणि नाट्याला अनुकूल अशी रचना करण्याची इच्छा या दोहोंच्या कात्रीत सापडल्यामुळे देवलांच्या हातून हा एक गोधडीवजा प्रवेश निर्माण झाला आहे. (अं ५ प्र.१) मूळ ग्रंथातील नायक नायिका यांच्या प्रथम भेटीचा हा प्रसंग नाटकात अत्यंत उठावदार व्हावयास हवा होता.

क्रीडापर्वतावरील मणिमंदिरात चंद्रापीडाची राहावयाची योजना होते. तेथून चंद्रापीड कादंबरीच्या दिशेकडे आणि आपल्या महालाच्या गच्चीवरून कादंबरी चंद्रापीडाकडे टक लावून पाहण्यात सर्व दिवस घालवितात. महाश्वेतेकरिता कादंबरीने अविवाहित राहण्याचा निश्चय केलेला आहे, म्हणून चंद्रापीडाचे मन शंकाकुल झालेले असते. रात्र पडल्यावर कादंबरीची दासी मदलेखा कौस्तुभमण्याप्रमाणे प्रकाशणारा मौक्तिकहार कादंबरीकडून भेट म्हणून घेऊन येते. त्यानंतर कादंबरी स्वतः मदलेखेला बरोबर घेऊन चंद्रापीडाच्या भेटीला येते. पण चंद्रापीड संकोचाने वागतो. बऱ्याच औपचारिक संभाषणानंतर कादंबरी कंटाळून निघून जाते.

मूळ ग्रंथातला हा सर्व आशय शापसंभ्रमाच्या पाचव्या अंकाच्या दुसऱ्या प्रवेशात चंद्रापीडाच्या एकाकी भाषणात सारांशरूपाने देवलांनी उल्लेखिला आहे.

इथून पुढे मूळ 'कादंबरी'चे कथानक अती वळणावळणाचे व गिचमोड बनले आहे. ही सर्व नागमोडी वळणे नाटकात घेणे अशक्य होते. अत्यंत ठळक आणि कथेच्या पर्यवसनास अवश्य असलेले प्रसंग तेवढे देवलांनी घेतले व बाकीचे सोडले. सुसंगती राखण्यासाठी काही बदल केले आणि सोडलेल्या भागाची वाचकाला जरूर तेवढी कल्पना आणून देण्यासाठी निवळ कथानिवेदनाचा एक प्रवेश (अंक ७ प्र. १) घातला.

कथानकाचे एक मोठे नागमोडी वळण इथेच आपणांला भेटते. हेमकूटात क्रीडापर्वतावरील मणिमंदिरात चंद्रापीड फक्त एक रात्र राहतो. दुसऱ्या दिवशी सकाळी कादंबरीचा निरोप घेऊन तो अच्छोद सरोवरापाशी परत येतो. त्याचा माग काढीत त्याचे सैन्य तेथे आलेले त्याला दिसते. ती रात्र त्याने तळमळत काढली. दुसऱ्या दिवशी पहाटे केयूरक येतो. चंद्रापीड त्याची एकीकडे भेट घेतो. तेव्हा तो कादंबरीच्या प्रेमविव्हल अवस्थेचे वर्णन करतो. ते ऐकून चंद्रापीडाच्या शंका कुशंका दूर होतात व घोड्यावर स्वार होऊन तो पुन्हा कादंबरीकडे जातो. जाताना पत्रलेखेला बरोबर घेतो. भेटीमध्ये पुन्हा त्याचे मन आंदोलायमान होते. कादंबरी काही बोलत नाही; मात्र 'पत्रलेखेला माझ्यापाशी ठेवा' एवढी विनंती करते. पत्रलेखेला तिच्यापाशी ठेवून चंद्रापीड सैन्याच्या शिबिराकडे परततो.

तळावर येताच "तुम्हांला जाऊन फार काळ लोटला. तेव्हा पत्र देखताच तातडतोब निघून घरी यावे," अशा आशयाचे तारापीडाचे पत्र चंद्रापीडाला मिळते. तेव्हा सैन्यासह मजल दरमजल करीत परत फिरण्याचे काम वैशम्पायनावर सोपवून, पत्रलेखा कादंबरीकडून काही दिवसांनी परत येईल, तिला आणण्याचे काम सेनापती मेघनादावर सोपवून चंद्रापीड घोड्याची मांड न सोडता तडक उज्जयिनीला परत येतो. काही दिवसांनी मेघनाद पत्रलेखेसह येऊन दाखल होतो. पत्रलेखा कादंबरीच्या विरहपीडित अवस्थेचे वर्णन करते व चंद्रापीडाला टाकोटाक तिच्याकडे जाण्यासाठी विनविते.

ही चंद्रापीडाची यातायात (शिबिरात परत येणे, पुन्हा हेमकूटावर कादंबरीकडे जाणे व पुन्हा परत येणे) चंद्रापीडाच्या व विशेषतः कादंबरीच्या मनोवस्थांची वर्णने विविध प्रकारांनी करण्यास वाव मिळावा म्हणून बाणभट्टाने योजलेली दिसते. पण नाटकात असल्या प्रकारांची पुनरुक्ती कंटाळवाणी व न पेलण्याजोगी होईल हे जाणून देवलांनी ही यातायात गाळली आहे. तो हेमकूटावर असताना तेथेच पत्रलेखा तारापीडाचे पत्र घेऊन येते व चंद्रापीड लगेच कादंबरीचा निरोप घेऊन पत्रलेखेला तिच्यापाशी ठेवून परततो असे दाखविले आहे. कादंबरीने आपल्या विरहव्यथेचे पत्रलेखेपाशी जे वर्णन केले (जे पत्रलेखेने चंद्रापीडाला निवेदिले) ते अत्यंत मनोरम आहे. पण त्यातला किंचित अंश अंक ५ प्र. ३ मध्ये आणून बाकीचे सर्व देवलांनी गाळले आहे. वास्तविक बाणाने पत्रलेखेच्या पात्राचा येथेच उत्तम उपयोग करून घेतला आहे. तो जर गाळला तर पत्रलेखेचे पात्र तरी देवलांनी नाटकात कशाला आणिले, हे समजत नाही.

पत्रलेखेच्या निवेदनाला मध्येच खंड पडतो. खुद्द बाणभट्टाने रचलेला भाग इथे समाप्त होतो. त्याच्या अचानक मृत्यूमुळे खंडित झालेला हा ग्रंथ त्याच्या विनम्र कर्तव्यनिष्ठ पुत्राने पूर्ण केला. आपल्या रचनेचा पित्याच्या वाणीशी बेमालूम जोड जमवून देण्यात बाणपुत्र भूषणभट्ट याने चांगले यश मिळविले आहे.

कादंबरी विरहाने व्याकूळ झाली असून चंद्रापीड आपल्यावर दया करील अशी तिला आशा उरलेली नाही, असे पत्रलेखेने सांगितले आणि कादंबरीकडे त्वरित परत जाण्याबद्दल चंद्रापीडाला विनविले. कादंबरीबद्दल आता मात्र चंद्रापीडाची खात्री पटली. तो आणि पत्रलेखा विलासवतीला भेटले. काही दिवसांनी केयूरक आला व त्याने कादंबरीची अवस्था अतिशय दुर्धर झाली असल्याचे सांगितले. इतके की तिच्या हताश अवस्थेचे वर्णन ऐकताच चंद्रापीडाला मूर्च्छा आली. त्याने केयूरकाबरोबर पत्रलेखेला तिच्याकडे पाठविले आणि 'मी लवकरच नक्की येतो, तू धीर धरून राहा;' असा निरोप केयूरकाबरोबर पाठविला.

इकडे परत आलेल्या सैन्याचा तळ जवळच पडला आहे असे चंद्रापीडाला कळते. तेव्हा वैशंपायनाला भेटण्यासाठी उत्सुक होऊन तो थोडी गंमत करावी या उद्देशाने रात्री वेष पालटून सैन्यशिबिरात गेला; तिथे सेनाधिकाऱ्याकडून त्याला जे वर्तमान कळले ते विस्मयकारक होते. अच्छोद सरोवराच्या काठी असलेल्या एका लता मंडपापाशी खिळवून टाकल्यासारखा वैशंपायन तिथेच राहिला. काही केल्या तेथून निघायला तो तयार होईना. काही हरवलेली वस्तू शोधीत असल्यासारखा तो तेथे वावरतो आहे. हे ऐकून चंद्रापीडाला खेद तर झाला; पण वैशंपायनाच्या शोधार्थ जाण्याची आता सहजच वडिलांकडून अनुज्ञा मिळेल व तसेच पुढे कादंबरीच्या भेटीला जाता येईल असाही विचार त्याच्या मनात आल्याखेरीज राहिला नाही.

राजवाड्यात परत येतो तो वडील मातुःश्री शुकनासाकडे गेलेले असून तेथे मनोरमा आपल्या पुत्राबद्दल मोठमोठ्याने विलाप करीत आहे असे त्याला आढळले. या विलक्षण प्रकारात चंद्रापीडाकडे काही दोष असला पाहिजे असे वाटून तारापीड त्याला बोलला. पण शुकनासाने चंद्रापीडावर अढळ विश्वास दाखवून राजाचे म्हणणे मोडून काढले. खरी गोष्ट काय असेल कोण जाणे, असे मग राजालाही वाटले. वैशंपायनाला परत आणायला जाण्यासाठी चंद्रापीडाने शुकनासाच्या मध्यस्थीने तारापीडाची परवानगी मिळविली. ज्योतिष्यांना दुसऱ्याच दिवशीचा मुहूर्त देण्यास सांगितले. विलासवतीने व तारापीडाने मोठ्या कष्टाने त्याला निरोप दिला. रात्रंदिवस वेगाने मजला मारीत त्याने अच्छोद सरोवर गाठले. वैशंपायन तेथे कुठे आढळेलच. त्याच्याबद्दल त्याला काळजी नव्हती. त्याचे सारे लक्ष कादंबरीकडे लागले होते. पण सरोवरापाशी येऊन पाहातो तो वैशंपायन कुठेच दिसेना. त्याला शोधण्यात वेळ घालवावा तर कादंबरीकडे जायला विलंब होणार. तोपर्यंत तिचे काही बरे वाईट झाले तर! ही आशंका त्याला भेडसावू लागली. शेवटी तो महाश्वेतेच्या गुहेकडे गेला. ती अत्यंत करुण स्वराने विलाप करते आहे व तरलिका तिला सावरून धरते आहे, असे दृश्य त्याला दिसले 'कादंबरीला काही झाले की काय?' या प्रश्नाला 'काही नाही' असे तरलिकेने उत्तर दिले.

काय झाले हे मग महाश्वेतेने सांगितले. ब्राह्मण तरुणाची (वैशंपायनाची) भ्रमिष्ट अवस्था, पूर्वीची ओळख असल्याचा त्याने केलेला अविर्भाव, त्याने केलेली प्रेमयाचना व लगट, अखेर तो आवरत नाही असे पाहून तिने दिलेला शाप व त्याचा मृत्यू हे सर्व महाश्वेतेने सांगितले. हे ऐकताच अगोदरच कादंबरीच्या चिंतेने ग्रस्त झालेले चंद्रापीडाचे हृदय दुभंग झाले आणि तो धाडकन खाली पडला.

महाश्वेतेने सांगितलेली हकीकत म्हणजे शापसंभ्रमाचा सहावा अंक, हे सहज लक्षात येईल. अगोदर सैन्याच्या तळावर चंद्रापीड चौकशीला गेला असता मांडलिकांनी वैशंपायन सरोवराजवळच्या लतामंडपाला कसा खिळून राहिला याची सांगितलेली हकीकत नाटकात प्रत्यक्ष दृश्यरूपाने आणली आहे. हा पहिल्या प्रवेशाचा पूर्वार्ध. या प्रवेशाचा उत्तरार्ध आणि संपूर्ण तिसरा प्रवेश म्हणजे मूळ 'कादंबरी' तील महाश्वेतेने सांगितलेली हकीकत व त्यानंतरचे चंद्रापीडाचे प्राणोत्क्रमण हा भाग होय. दुसऱ्या प्रवेशात चंद्रापीडाचे तेथे आगमन व त्याने सेवकांपाशी वैशंपायनाची केलेली विचारपूस हा भाग आला आहे. वैशंपायन हा पुंडरीकाचा पुढचा जन्म असल्यामुळे त्याची गत काय झाली हे प्रत्यक्ष दृश्यरूपाने दाखविणे इष्ट होते. शिवाय या प्रसंगात नवलपूर्णता आणि उत्कटता असल्यामुळे तो नाट्यगुणांनी युक्त आहे. तेव्हा प्रत्यक्ष दृश्याकरिता देवलांनी हा अंश निवडला हे योग्य केले असे म्हटले पाहिजे.

मूळ 'कादंबरी'च्या कथानकातला चंद्रापीड कादंबरीच्या निवासस्थानाहून परतल्यानंतरचा केवढा भाग देवलांनी गाळला हे वर दिलेल्या सारांशावरून लक्षात येईल. त्यात अनेक ठिकाणी रसप्रकर्ष आहे, वैचित्र्य आहे. पण बहुतेक प्रसंग निवेदनाच्या स्वरूपाचे; त्यात नाटयानुकूलता कमी. शिवाय प्रेक्षकांना ते असंबद्ध वाटले असते. वैशंपायनाचा हा प्रसंगदेखील असंबद्ध वाटण्याजोगा आहेच. पण वैशंपायन कोण हे मागे (अंक ४, प्र. १) सांगण्यात आले आहे; शिवाय महाश्वेतेचा मोठा दुवा आहे. तेव्हा देवलांची निवड त्यातल्या त्यात ठीक आहे, याच निष्कर्षाप्रत आपण येतो.

महाश्वेता आणि चंद्रापीडाचे सेवकजन चंद्रापीडाच्या मृत देहाजवळ शोक करीत आहेत, इतक्यात शृंगारिक वेष केलेली कादंबरी, मदलेखा व पत्रलेखा यांच्यासह तेथे येते. चंद्रापीड मागून लवकरच येतो आहे असे पत्रलेखेने सांगितल्यावरून त्याला भेटण्याच्या उत्कंठेने ती आली होती. चंद्रापीडाचे शव पाहताच ती बेशुद्ध झाली. शुद्धीवर येताच पुतळ्यासारखी तटस्थ होऊन धीरगंभीर वाणीने म्हणाली, "अश्रू ढाळून या दिव्य देहाला मी कशाला विटाळू ? आता मृत्यू हेच माझे जीवन आणि जगणे हाच मृत्यू. तेव्हा माझ्या सहगमनासाठी चिता तयार करा." इतक्यात आकाशवाणी झाली की, "वत्से महाश्वेते धीर सोडू नकोस, पुंडरीकाशी तुझे मीलन लवकरच होईल. चंद्रापीडाच्या शरीरातून प्राण गेले ते शापामुळे. शापाचा परिणाम नाहीसा होईपर्यंत शरीराचे रक्षण करा. त्यानंतर ते सजीव होऊन दोघांचे मीलन होईल." आकाशवाणी ऐकल्यानंतर पत्रलेखेने इंद्रायुध अश्वाला घेऊन सरोवरात उडी टाकली. लगेच जलातून एक तपस्वी तरुण वर आला. तोच कपिंजल. एका क्षणातच महाश्वेतेने त्याला ओळखले आणि नमस्कार केला.

महाश्वेतेने कपिंजलाला प्रश्न विचारले. त्याने सांगितली ती हकीकत अशी, "पुंडरीकाचे शरीर ज्याने उचलून नेले तो प्रत्यक्ष चंद्रमा. मी त्याच्या मागोमाग गेलो तेव्हा तो म्हणाला, 'पुंडरीक मदनसंतापाने व्याकुळ झाला असता चंद्रप्रकाशामुळे आपला दाह होतो असे वाटून त्याने मला शाप दिला. विनाकारण शाप दिलेला पाहून मीही रागावून त्याला शाप दिला. राग ओसरल्यावर मनात विचार आला की, महाश्वेता ही माझ्या किरणांपासून उत्पन्न झालेल्या कुलात जन्मलेली; तिच्या सुखाकरिता तिच्या प्रियकराच्या देहाचे रक्षण केले पाहिजे. म्हणून शाप संपेपर्यंत त्याचा देह मी इथे आणून ठेवला आहे. तू हे श्वेतकेतूंना जाऊन सांग, म्हणजे ते यासंबंधी जे उपाय करायचे ते करतील.' तेव्हा मी श्वेतकेतू ऋषींकडे निघालो. वाटेत घाईमुळे एका वैमानिकाच्या अंगावरून गेल्यामुळे त्याने तू घोडा होशील असा मला शाप दिला. मी त्याला घाईचे कारण समजावून सांगितले, तेव्हा त्याचे अंतःकरण द्रवले आणि 'तू ज्याचा अश्व होशील त्याचा मृत्यू होईपर्यंतच तुझे अश्वपण राहील. आणि तुझा मित्र पुंडरीक आणि चंद्र हे सध्या जेथे जन्म घेत आहेत तेथेच अश्व म्हणून तू राहशील.' असा मला उःशाप दिला. लगेच मी घोडा झालो. तरी पूर्वजन्माचे मला स्मरण होते, म्हणूनच मी किन्नराच्या मागे लागलेल्या चंद्रापीडाला इथे आणले. तुझ्यामागे लागलेल्या ज्या तरुणाला तू शाप दिलास तो (पुढच्या जन्मातला) पुंडरीकच होता."

महाश्वेतेनें पत्रलेखेविषयी विचारले. तेव्हा कपिंजल म्हणाला, "तिचे पुढे काय झाले हे मला माहीत नाही. तसेच चंद्रापीड व पुंडरीक यांचे पुढचे जन्म कोठे झाले आहेत याची कल्पना नाही. श्वेतकेतू ऋषींना हे विचारण्याकरिता आता त्यांच्याकडे जातो." असे म्हणून तो आकाशमार्गे निघून गेला.

इकडे कादंबरी आणि महाश्वेता यांनी आकाशवाणीवर विश्वास ठेवून चंद्रापीडाचे शरीर रक्षण करण्याचा निश्चय केला. कादंबरीने विरक्त वेष धारण केला. दुसऱ्या दिवशी आपल्या मातापितरांना झालेली सर्व हकीकत सांगण्यासाठी तिने मदलेखेला पाठविले. पावसाळा संपल्यानंतर चंद्रापीडाची चौकशी करण्याकरिता तारापीडाकडून दूत येऊन दाखल झाले. त्यांनाही झालेला सर्व वृत्तान्त सांगून परत पाठविण्यात आले.

चंद्रापीडाची बातमी घेऊन दूत परत आले तेव्हा त्यांच्या सुरुवातीच्या शब्दांनीच विलासवती मूर्च्छित झाली. पुढे चंद्रापीडाचे हृदय दुभंग झाले असे त्यांनी सांगताच तारापीडाचा शोक अनवार झाला व त्याने अग्निकाष्ठ भक्षण करण्याचा हेतू व्यक्त केला. शुकनासाने त्याला शांत केले. शेवटपर्यंत वृत्तान्त ऐकल्यानंतर जेव्हा त्याला कळले की चंद्रापीडाचे शरीर तसेच रक्षण करण्यात आले आहे, तेव्हा त्याने त्या ठिकाणी जाण्याचा निश्चय केला. विलासवती, शुकनास, मनोरमा आणि उज्जयिनीचे नागरिक

अनुक्रमणिका

हेही बरोबर निघाले. सरोवराच्या काठी महाश्वेतेच्या गुहेजवळ येऊन पोचले. चंद्रापीडाचे शरीर दिवसेंदिवस अधिकाधिक सतेज होत आहे असे त्यांना कळले, तेव्हा त्यांनी आत प्रवेश केला. त्यांना पाहताच कादंबरी मूर्च्छित पडली. विलासवतीने रडत रडत चंद्रापीडापाशी जाऊन त्याला हृदयाशी कवटाळले. तारापीडाने तिला बोध केला आणि कादंबरीला सावध करायला आणि शुकनास मनोरमा यांचे सांत्वन करायला सांगितले. अखेर जवळच एक आश्रम बांधून तारापीड विलासवती शुकनास मनोरमा पुढे काय होते याची वाट पाहात दिवस कंठू लागले.

– ३ –

जावाली मुनी म्हणाले, " माझी कथा संपली. दिव्य लोकात जन्म पावलेल्या व्यक्तीलासुद्धा प्रबळ कामविकारामुळे मृत्युलोकात शुकनासाच्या पोटी वैशंपायन म्हणून जन्म घ्यावा लागला हे तुम्ही ऐकले. पित्याच्या रोषामुळे आणि महाश्वेतेच्या शापामुळे त्याला शुक पक्षी व्हावे लागले, तोच हा आपल्यासमोर असलेला शुक ( राघू ) होय. " एवढे बोलून जाबालींनी आपली कथा संपविली.

' कादंबरी 'च्या कथानकाचे तिसरे पुट इथे संपते. दुसरे पुट, म्हणजे तिसऱ्या पुटाला व्यापून राहिलेली शुकाची कहाणी पुढे चालू राहिली आहे. शुक सांगू लागला, "जाबाली याप्रमाणे सांगत होते त्याच वेळी माझ्या डोळ्यावरचे पटल गळून पडले. आणि मी शरीराखेरीज सर्व बाबतीत पूर्वजन्मीचा वैशंपायन झालो. चंद्रापीडाची ओढ लागली, महाश्वेतेविषयींचा अनुराग जागृत झाला. पण पंखांची वाढ पूर्ण झाली नाही तोपर्यंत कुठेही जाण्याचा अविचार करायचा नाही असे जाबाली मुनींनी बजावले. हारीताने विचारले की, याचा मुनी म्हणून जन्म झाला असता हा इतका कामी आणि विकारवश कसा ? त्यावर जाबाली म्हणाले, " याचा जन्म ज्या प्रकाराने झाला त्याचा हा परिणाम होय. श्वेतकेतू ऋषींच्या नुसत्या दर्शनानेच लक्ष्मीची वासना अनावर होऊन तिला हा पुत्र झाला. पुरुषाशी संबंध न येता हा झाल्यामुळे निग्रहाचा अभाव, अतिविकारीपणा याच्या ठायी दिसून येतो. याच कारणामुळे हा दोन्ही जन्मांत अल्पायुषी झाला. "

हे ऐकून मला आपल्या स्वतःविषयी घृणा उत्पन्न झाली, आत्मनाश करून घ्यावा असा विचार मनात आला. इतक्यात माझा जिवलग मित्र कपिंजल मला भेटावयाला आला. त्याने मला हृदयाशी कवटाळले; माझी ही अशी दशा पाहून त्याला अश्रू आवरेनात. तो म्हणाला, " मी श्वेतकेतू ऋषींच्या निकट होतो. आजच त्यांनी मला सांगितले की तुला आता पूर्वजन्मीची स्मृती आली आहे. तुझ्या अंगचे सर्व दोष जळून जाऊन शाश्वत आनंदाचे जीवन तुला प्राप्त व्हावे म्हणून त्यांनी साधना चालविली आहे. याकरिताच त्यांनी आणि लक्ष्मीने मिळून यज्ञ आरंभिला आहे. तो पूर्ण होईपर्यंत तू इथून कोठेही हलू नकोस असा तुला त्यांनी निरोप सांगितला आहे. " पूर्वीच्या सुखदुःखांच्या आठवणीत काही काळ घालविल्यानंतर कपिंजल निघून गेला.

" काही दिवसांनी मला जाणीव झाली की आपणाला पंख फुटले आहेत. पुन्हा चंद्रापीड व महाश्वेता यांना भेटण्याची इच्छा अनावर होऊन त्यांच्याकडे जाण्याकरिता मी उडत चाललो. वाटेत थकून निजलो असता एका पारध्याने मला जाळ्यात पकडले. ' मला का हा नाहक बंदिवास ? ' असे मी विचारले, तेव्हा तो म्हणाला, ' माझा मालक चांडाळांचा राजा पक्कनास याच्या कन्येने अशा अशा वर्णनाचा पोपट दिसल्यास त्याला पकडून आण म्हणून आज्ञा केली; त्यावरून मी तुला जाळ्यात पकडले. जास्तीचे मला काही माहीत नाही. ' म्लेच्छांच्या संगतीत राहण्याची पाळी यावी याबद्दल मला अतोनात खेद झाला. त्या पारध्याने मला चांडाल राजकन्येच्या हवाली केले. " माझ्या मुला बरा गवसलास ! " असे म्हणून तिने प्रथम लाकडी पिंजऱ्यात नंतर काही दिवसांनी सोनेरी पिंजऱ्यात मला अडकवून टाकले आणि आपल्या दरबारात आणून हजर केले. महाराज ( शूद्रक राजास उद्देशून ) ती कोण आहे व मला तिने का बंदिस्त केले याचे मला आपल्या इतकेच गूढ आहे. "

पोपटाने सांगितलेली कहाणी इथे संपते म्हणजेच कादंबरीच्या कथानकाचे दुसरे पुट येथे बंद होते व त्याच्या बाहेरच्या केवळ कविनिवेदनाच्या पुटात आपण प्रवेश करतो.

चांडालकन्येविषयी पोपटाने आपले अज्ञान प्रकट केल्यानंतर शूद्रक राजाने तिला बोलावणे पाठविले. येताक्षणीच ती म्हणाली, " भुवनभूषणा, कादंबरीलोचनानन्द चन्द्रा ! या दुर्मतीचा आणि स्वतःचा वृत्तान्त तू ऐकलासच. श्वेतकेतूंची साधना संपेपर्यंत त्यांच्याच आज्ञेने मी याला पिंजऱ्यात बंदिस्त करून ठेवले होते. आता ती



अनुक्रमणिका

संपली आहे, म्हणून तुम्हा दोघांना मी एकत्र केले आहे. तेव्हा या दुःखमय मर्त्य शरीराचा त्याग करून दोघेजण एकत्र सुखाने राहा." एवढे बोलून ती आकाशमार्गे दिव्यलोकाला गेली. ती लक्ष्मीच चाण्डालकन्या होऊन आली होती.

शूद्रकाच्या मनावरचे पटल एकदम दूर झाले. पुंडरीकाने दिलेल्या शापाचा भोग पूर्ण झाला होता. कादंबरीच्या मीलनासाठी त्याचे हृदय उत्कंठित झाले. वसंतागमनामुळे त्याचा प्रीतिज्वर द्विगुणित झाला.

इकडे कादंबरीची अवस्थाही तशीच झाली. तिचा संयम उडून गेला आणि तिने चंद्रापीडाच्या शरीराला आलिंगन दिले. काय चमत्कार ! तत्क्षणी चंद्रापीडाचे शरीर सजीव झाले आणि त्याने तसेच दृढ आलिंगन दिले. "अमृतापासून तुझ्या वंशाचा उद्भव, म्हणून तुझ्यामुळे मी जिवंत झालो." चंद्रापीडाने प्रेमालिंगन देताना म्हटले. "पुंडरीकदेखील शापापासून मुक्त होऊन येत आहे." असे तो म्हणतो आहे इतक्यात महाश्वेतेच्या विरहाने प्राण सोडताना तो जसा होता तशाच आकृतिवेषात, मौक्तिकहारासह, पुंडरीक आकाशातून उतरला व महाश्वेतेला भेटला. लगेच केयूरक हेमकूटावर चित्ररथ, हंस यांना ही मंगलवार्ता कळवायला गेला व मदलेखा तारापीड, शुकनास यांच्याकडे गेली. सर्व मंडळी जमली. चंद्रापीडाने पुंडरीकालाच वैशंपायन माना असे शुकनासाला विनविले. इतक्यात कपिंजल उतरला व श्वेतकेतू महर्षींचा संदेश त्याने कथन केला. 'पुंडरीकाचे पितृत्व मी सोडून दिले आहे. माझ्यापेक्षा तुम्हीच त्याचे अधिक निकटच्या अर्थाने पिता आहा. तेव्हा त्यालाच आपला वैशंपायन मानावे.' शुकनासाने या संदेशाचा सादर स्वीकार केला. सर्व मंडळी गंधर्व राजधानीला गेली व तेथे चंद्रापीड, कादंबरी यांचा विधिपूर्ण विवाह साजरा झाला.

नंतर चंद्रापीड उज्जयिनीला गेला. पुंडरीकाला त्याने सिंहासनावर बसविले, मांडलिकांना राजपद दिले; आणि स्वतः कादंबरीसह केव्हा उज्जयिनीस तर केव्हा हेमकूटास, तर केव्हा चंद्रलोकात राहू लागला. चारीजणांनी परस्पर सहवासात अनंत काळ सुखाने जीवन व्यतीत केले.

आतापर्यंत ज्या धोरणाने नाटकाची रचना केली त्यास अनुसरून या सर्व गुंतागुंतीतून सातव्या अंकाची सामग्री निवडून निराळी करणे विशेष कठीण नव्हते. मूळ कादंबरीची संपूर्ण कल्पना वाचकांना दिली पाहिजे म्हणून तिचा संगतवार सारांश येथवर दिला. आता देवलांची रचना पाहू.

सातव्या अंकाचा पहिला प्रवेश वृत्तान्तनिवेदनपर आहे. त्यातील आशय मागे निवेदन केलाच आहे. दुसरा प्रवेश तारापीड व विलासवती चंद्रापीडाच्या शरीराजवळ येतात, कादंबरी मूर्च्छित पडते, विलासवती शोक करते, या प्रसंगावर रचलेला आहे. तो मुळाला अगदी धरून आहे. तिसरा पर्यवसानाचा प्रवेश तोही मुळाला अनुसरणारा आहे.

मूळ 'कादंबरी'त कपिंजलाने सांगितलेली शापांची हकीकत देवलांनी शापसंभ्रमात अंक ३ मध्ये प्रत्यक्ष दृश्यरूपाने घातली आहे. आणि खुद्द कपिंजलाची नंतरची हकीकत अंक ४ प्र. १ मध्ये आणली आहे. तो प्रवेशही अंक ७ प्र. १ प्रमाणे वृत्तान्तनिवेदनपर आहे. 'कादंबरी'च्या आरंभीच्या आणि अखेरच्या भागात आलेला शुकाचा विस्तीर्ण वृत्तान्त देवलांनी गाळला आहे. याचे कारण उघड आहे. तो अद्‌भुत असला तरी त्यात नाट्य नाही आणि तो रंगभूमीवर दाखविता येण्याजोगा नाही. या अखेरच्या भागातल्या चंद्रापीड कादंबरी संबंधाच्या वर्णनाचा मात्र आदर केला आहे. आणि ती सुटसुटीत, चित्तवेधक संवादांच्या स्वरूपात प्र. २ व ३ मध्ये यथातथ्य रूपात आणिली आहेत.

मूळ 'कादंबरी'ची स्थूल कल्पना आणून देण्यापुरती तिची रूपरेषा आणि देवलांनी तिच्यातून केलेली निवड वर दाखल केली. त्यावरून असे दिसेल की देवलांनी पुंडरीक–महाश्वेता (अंक १ ते ३) आणि चंद्रापीड कादंबरी (अंक ५ व ७) यांच्या प्रणयकथानकांचीच फक्त उचल केली आहे. त्याखेरीज बाकीचा उरलेला कथाभाग केवळ निवेदनपर असे दोन प्रवेश (अंक ४ प्र. १, अंक ७ प्र. १) घालून त्यात दाटीने बसविला आहे. केवळ प्रणयकथानकेच सांगायची होती तर या दोन प्रवेशांची देखील आवश्यकता नव्हती. जरूरीपुरते कथानकाचे धागे प्रणयकथानकाला वाहिलेले जे प्रवेश आहेत त्यात गुंफून देणे ही कुशल रचनाकाराला फारशी कठीण गोष्ट नव्हती. निराळे प्रवेश घातले यातही फारसे बिघडले असे नाही. पण रंगभूमीवर ते करून दाखविल्यास ते नीरस होतील व प्रेक्षकांना त्यापासून फारसा बोध होणार नाही. रंगभूमीवर ते गाळल्यास बुद्धिमान्, विचक्षण प्रेक्षकांना ती त्रुटी जाणवेल. अंक ४ प्र. २ मध्ये येणारा चंद्रापीड हा कोण, नाटकाच्या अगदी शेवटी पुंडरीक पुन्हा कसा अवतरतो, इत्यादी गोष्टी त्यांना उमजणार नाहीत.

दोन्ही प्रणयकथानकांमध्ये न मोडणारा असा आणखी एक भाग आहे. तो महत्त्वाचा आहे. तो म्हणजे वैशंपायनाच्या पर्याकुल अवस्थेचे दर्शन घडविणारा सहावा अंक. पुंडरीक-महाश्वेतेच्या प्रणयकथानकाचा हा भाग नव्हे, कारण वैशंपायन ही निराळी व्यक्ती आहे. उज्जयिनीला गेलेला चंद्रापीड पुन्हा अच्छोद सरोवरावर कसा आला आणि त्याचे प्राणोत्क्रमण कसे झाले हे दाखविण्यासाठी हा भाग आवश्यक आहे. शिवाय महाश्वेतेच्या चारित्र्याचे काही महत्त्वाचे पैलू या भागात प्रकट होतात. पण दोन्ही कथानकांपासून हा भाग अलग तुटक असा वाटतो. रंगभूमीवर सामान्य नटाच्या हाती हा भाग कंटाळवाणा होणार.

वर केलेल्या विश्लेषणावरून हे लक्षात येईल की मूळ 'कादंबरी'च्या कथानकाचे बहुतेक सर्व भाग, त्यातील कित्येक बारीकसारीक गोष्टीसुद्धा, आपल्या नाटकात आणण्याचा देवलांनी प्रयत्न केला आहे. प्रत्यक्ष दृश्यरूपाने जे जे अंश घालणे शक्य झाले नाही, त्यांचा केवळ निवेदनपर प्रवेशात नुसता उल्लेख केला आहे. 'कादंबरी'च्या आधाराने बक्षिसाकरिता नाटक लिहायचे, तेव्हा 'कादंबरी'ला शक्य तोवर सोडता कामा नये या कल्पनेचा पगडा त्यांच्या मनावर बसलेला दिसतो. त्यामुळे गोधडीवजा प्रवेश, केवळ निवेदनपर प्रवेश, इत्यादी कंटाळवाणा भाग नाटकात आला आहे. मृच्छकटिकाइतकेही गाळागाळीचे स्वातंत्र्य त्यांनी घेतले नाही. बक्षीस मिळविण्याच्या व्यावहारिक उद्देशामुळे उत्तम नाट्यदृष्टी असलेल्या लेखकालाही तडजोड करावी लागली, असे इथे आपल्या प्रत्ययास येते.

पुंडरीक–महाश्वेता आणि चंद्रापीड–कादंबरी ही दोन प्रणयकथानके आहेत. त्यांपैकी एकेकटे कथानक इतके भरदार व परिपुष्ट आहे की प्रत्येकावर एक स्वतंत्र नाटक लिहिता आले असते व ते सुंदर, परिणामकारक झाले असते. बाणाच्या 'कादंबरी'मध्ये ही दोन्ही कथानके एकमेकांशी निगडित आहेत हे खरे, पण कल्पनाशाली रचनाकाराला ती एकमेकांपासून अलग करणे आणि एकेकट्या कथानकाचे सुश्लिष्ट संगीत नाटक बनविणे ही फार कठीण कामगिरी नव्हती. पण देवलांना बक्षिसासाठी संपूर्ण 'कादंबरी' वर नाटक लिहायचे होते. अर्ध्याच कादंबरीवर (त्यात पुष्कळसे बदल करून) नाटक लिहिले आणि ते शर्तींनुसार नसल्यामुळे परीक्षकांनी नापसंत केले तर!

बक्षिसाकरिता नाटक लिहिणे वाईट असे येथे सुचवायचे नाही. पण या उद्देशामुळे ज्या मर्यादा पडतात त्यांचा निर्देश करणे समालोचनाच्या परिपूर्णतेच्या दृष्टीने अवश्य होते. रचनेचे स्वातंत्र्य घेतले असते तर 'कादंबरी'चा बोधात्मक आशय लक्षात घेऊन महनीय कलाकृती निर्माण करता आली असती. पण बक्षिसाकरिता लिहिणाऱ्याने तितके स्वातंत्र्य घेणे अव्यवहारीपणाचे ठरले असते. शिवाय देवलांच्यामध्ये ती दृष्टी नव्हती. मृच्छकटिकाविषयी विचार करताना आपण हे पाहिले आहे.

बाणाच्या 'कादंबरी'मध्ये चंद्रापीड-कादंबरी ही नायकनायिका असली तरी पुंडरीक महाश्वेता यांचे कथानक पायाभूत आहे. बाणाला जीवनविषयक तत्त्वार्थ जो व्यक्त करायचा आहे तो त्याने यातून व्यक्त केला आहे. अतिरेकी वासनेतून आणि अधीर वृत्तीतून ज्याचा जन्म होतो ते संतानही तशाच प्रकृतीचे निपजते. पूर्वार्जित त्याला जन्मभर किंबहुना अनेक जन्मांमध्ये देखील, सोडीत नाही. पुंडरीक, लक्ष्मीच्या अतिरेकी व उतावळ्या कामवासनेमुळे जन्मास आला, त्यामुळे तो अतिकामी व अधिऱ्या प्रकृतीचा बनला. हे रहस्य जाबाली मुनींनी हारितप्रभृती शिष्यांना सांगितले. या त्याच्या पूर्वार्जितामुळे प्रत्येक जन्मामध्ये तो अधिकाधिक घसरत गेला. पुंडरीक दिव्य पुरुष म्हणून जन्मला, त्याचा पुढील जन्म मृत्युलोकी मानवाच्या पोटी वैशंपायन म्हणून झाला, त्याच्या पुढील जन्म आणखी नीच अवस्थेत म्हणजे पक्षियोनीत त्याला घ्यावा लागला. या प्रत्येक जन्मामध्ये त्याची उतावळी विकारवशता प्रकट झाली. पहिल्या दोन जन्मांमध्ये ती अनर्थास कारणीभूत झाली.

हे काहीसे इब्सेन या पाश्चात्त्य नाटककाराने *Ghosts* या आपल्या नाटकात दर्शविले त्यासारखे आहे. पूर्वार्जित पाप संततीवर उमटल्याखेरीज राहात नाही. हे साम्य निसटते व अधःपतनापुरतेच दिसेल. पाश्चात्त्य साहित्यकलाकारांची धाव ट्रॅजेडी (अनर्थापात) कडे व तेथपर्यंतच जाते. बाणभट्टाने भारतीय वृत्तीस अनुसरून उन्नयनाची दिशा दाखविली आहे. अधःपतित आत्म्याचे उन्नयन होऊ शकते. कशाने? तपश्चर्येने, व्रताचरणाने. पिता श्वेतकेतू ऋषी याने मंत्रपुरश्चरण केले, यज्ञविधी आचरिला आणि प्रेयसी महाश्वेता हिने कठोर व्रत आचरिले. या दोहोंमुळे पुंडरीकाच्या दोषांचा निरास होऊन त्याला स्थिर आनंदाचे पद प्राप्त झाले.

हा जीवनविषयक बोध बाणभट्टाने स्पष्टपणे निर्देशिला आहे. त्यात गूढता नाही. तो आधारार्थ घेऊन श्वेतकेतू आणि लक्ष्मी ही पात्रे प्रकटपणे पुढे आणून पुंडरीक महाश्वेता यांना नायक-नायिका करून एक सुंदर तत्त्वगर्भ नाटक रचता आले असते. मात्र असे करण्यासाठी 'कादंबरी'चे कथानक सोडून बराच आजूबाजूस संचार करावा लागला असता. पण तत्त्वगर्भता देवलांच्या प्रकृतीत नव्हती. असे काही उदात्त नाट्य त्यांना सुचणे दुरापास्त होते. असले स्वातंत्र्य घेण्याचा त्यांनी कधीही प्रयत्न केला नाही.

८

कादंबरीरूपी भव्य विशाल प्रस्तरातून त्यांनी कोरून काढले ते एक संगीत नाटक. हे नाटक एकमुखी एकपाखी होणे अशक्य होते. पुंडरीक-महाश्वेतेचे कथानक घ्यायला पाहिजेच होते, आणि चंद्रापीड-कादंबरीचे कथानक टाळणे योग्य नव्हते. दोन कथानकांची ही मूलभूत अपरिहार्यता मान्य करून आपण देवलांच्या रचनेकडे पाहू लागलो म्हणजे त्यांच्या कुशलतेने मन आनंदित झाल्याखेरीज राहात नाही. शापसंभ्रमाचे पहिले तीन अंक अद्भुतरम्य प्रणयकथानकाच्या नाटकात जितके सुंदर असू शकतील तितके सुंदर आहेत. पहिला अंक तर अप्रतिम आहे. किर्लोस्करी पद्धतीच्या संगीत नाटकांमध्ये इतका सुंदर पहिला अंक क्वचितच असेल. सुरुवात महाश्वेतेच्या सखींच्या गोड थट्टेने झाली आहे. चतुरिका आणि तरलिका या सख्यांसह महाश्वेतेचा प्रवेश आणि सख्यांची थट्टेची भाषणे, हे सर्व देवलांनी आपल्या कल्पनेने घातले आहे. मूळ 'कादंबरी'त त्याला काही आधार नाही.

चतुरिका :— महाश्वेते, जरा दम धर; म्हणजे दिवसभरचसे काय पण रात्रभरसुद्धा या लतामंडपात बसायला सापडेल बरं का, मग इकडे कधी येशील ते आम्हांला कळवायची सुद्धा नाहीस. तुला नाही हो. मी आपले असेच एका माणसाला म्हटले.

महाश्वेता :—( रागाने ) हेग काय तुझे ? थट्टा थट्टा म्हणजे करावी किती मेली ! चला तुमच्याबरोबर बोलतच नाही. मी आपली एकटीच मौज पाहीन. ( जाते. )

अशा शृंगारिक थट्टेनंतर, मधुर सुगंधाच्या रोखाने महाश्वेतेचे जाणे, ' मधुर किती । कुसुमगंध सुटला ' ॥ हे चपळ चालीवरचे सुंदर पद, लगेच पुंडरीकाचे दर्शन,

पुरश्चक्षूरागस्तदनु मनसोऽनन्यपरता ।

अशा रीतीने परस्परांचे प्रेमबंधन, दोघांच्या शृंगारपोषक हालचाली, मन आवरण्याचा पुंडरीकाचा विफल प्रयत्न, कपिंजलाचा प्रवेश व त्याची निर्भर्त्सना, त्यामुळे प्रेम प्रकरणाला आलेली संघर्षमूलक तीव्रता, स्फटिकमाळ आणि मौक्तिकहार यांची अदलाबदल, सोत्कंठ स्थितीत दोघांचा वियोग, या गोष्टी साध्या मधुर संवादांमध्ये आणि पदांमध्ये अशा मुलायम रीतीने गुंफल्या आहेत की वाचक–प्रेक्षकाला वेताबाताची खळखळ असलेल्या तरंगांवरून सुळसुळत गेल्याप्रमाणे वाटावे. फुलांच्या गालिच्यावरून चालत जावे तसे देवलांचे संवाद वाटतात. त्यांची पदे गद्याइतकीच प्रसादपूर्ण. त्यांच्या संवादांमध्ये गद्य व पद्य यांचा मिलाफ असतो. गद्य संपले की पद्यभाग मनातल्या मनात गुणगुणत आपण सफाईने पुढे जातो. तारतम्य बुद्धीचा नट असेल तर तो पदे गातानाही प्रेक्षकाला तसाच अनुभव घडवील.

शापसंभ्रमाचे पुढील अंकही असेच प्रसादपूर्ण आहेत. संवादात माधुर्य आणि प्रसाद हे गुण कोठे कमी पडले आहेत असे दिसत नाही. ठायीठायी मूळ कादंबरीतल्या कल्पना घेतल्यामुळे काव्यसौंदर्याच्या आल्हादक पुष्पवाटिका फुलल्या आहेत. देवलांचा स्थायीभाव संयम त्यातही कुठे सुटलेला नाही. त्यांचे उद्देश लक्षात घेता त्यांनी ' कादंबरी 'च्या कथानकापासून विशिष्ट अंशाची केलेली निवड आणि जुळवाजुळव ही उचित अशीच आहे. कोल्हटकरांची शापसंभ्रम नाटकावरील टीका प्रतिकूल बुद्धीनेच लिहिली आहे. तरी त्यांना रचनाकौशल्याबद्दल आणि भाषामाधुर्याबद्दल देवलांना प्रशस्तिपत्र द्यावेच लागले आहे.

" ' कादंबरी 'चे नाटक करणारास यासंबंधाने किती अडचणी येतात, हे एक त्या ग्रंथकर्त्यास ठाऊक. कादंबरीचे संविधानक अशा तऱ्हेचे आहे की, ते कथेच्या रूपाने आणले असता मात्र सरस वाटावे, पण नाटकरूपाने आले की नीरस व्हावे. तीन जन्मांतल्या उलाढाली तीन तासांत आटपून टाकावयाच्या, हे लहानसहान कर्म नव्हे. धन्य त्या देवलांची की त्यांनी या नाटकाला इतपत तरी रूप आणले आहे. "

पुढे ते आणखी म्हणतात––

"......संविधानकात रा. देवल यांनी बरेच चातुर्य दाखविले आहे. कथानकातील बोजड क्षुल्लक भागांची विष्कंभकांच्या रूपाने त्यांनी विल्हेवाट लाविली आहे, व प्रमुखच गोष्टींस प्रमुखत्व दिले आहे. तसेच एकच गोष्ट पुनः पुनः न देण्याविषयी त्यांनी खबरदारी घेतली आहे.

...नाटकाची एकंदर भाषा आरंभापासून शेवटपर्यंत साधी व मनोरम घातली आहे; व बाणाचा मुख्य गुण जो शब्दलालित्य त्याचा सर्रास उपयोग करून घेतला आहे. शोक, शृंगार इत्यादी प्रधान रस काही ठिकाणी अत्युत्तम साधले आहेत." कोल्हटकरांचे देवलांना एवढे प्रशस्तिपत्र म्हणजे देवलांचा फार मोठा विजय समजला पाहिजे!

रचनाचातुर्य कितीही असले तरी काही भाग कंटाळवाणा होणारच. 'कादंबरी' सारख्या ग्रंथाचा आधार न सोडता लिहिलेल्या नाटकात हे अपरिहार्य आहे. असे कंटाळवाणे भाग कोणते आहेत हे मागे निर्देशिले आहे. कंटाळवाणे हे विशेषण देताना देखील तारतम्य बाळगले पाहिजे. तिसऱ्या अंकानंतर 'शापसंभ्रमा'चा प्रयोग कंटाळवाणा होऊ लागतो असे म्हटले जाते. नाट्य हे फार विशाल आहे; निरनिराळ्या पातळ्यांवर त्याचा आविर्भाव होतो. चवथ्या अंकात चंद्रापीड महाश्वेता यांच्या भेटीत व संलापात प्रशान्त नाट्य आहे. ते हृदयंगम आहे. सहाव्या अंकात दाखविलेल्या वैशंपायनाच्या भ्रमिष्टपणापर्यंत झुकणाऱ्या पर्याकुल अवस्थेत हृदयभेदक नाट्य आहे. पण हे सगळे तितक्या पातळीवरचा रसिक असेल त्याला. डॉ. प. ल. वैद्य यांनी नाटकासंबंधाने लिहिताना "सुसंस्कृत व सुशिक्षित प्रेक्षकवर्गाचा भरणा असल्यास त्यांना या नाटकाचा प्रयोग कंटाळवाणा वाटणार नाही. पण तसा प्रेक्षकवर्ग नसेल तर त्यास हे नाटक तितकेसे आवडणार नाही," असे समुचित उद्गार काढले आहेत. त्यांनी स्वतः संस्कृत काव्यग्रंथांचे अध्ययन केल्यानंतर १९०४-५ साली किर्लोस्कर ना. मं. ने केलेला शापसंभ्रमाचा प्रयोग पाहिला. त्या विषयी "नाट्यशास्त्रदृष्ट्या आम्हां पाठशाळेतील विद्यार्थ्यांना हा प्रयोग अत्यंत आवडला." असा अभिप्राय त्यांनी नमूद केला आहे.

प्रेक्षकांच्या पातळीप्रमाणे नटांच्या योग्यतेचाही मुद्दा लक्षात घेण्याजोगा असतो. गणपतराव जोशांनी अतिविचारी, अतिशंकी हॅम्लेट अप्रतिम रीतीने दाखवला, गुन्हेगारीमुळे भ्रमिष्ट बनलेली दर्याबाई बाळाभाऊ जोगांनी चित्तथरारक रीतीने रंगभूमीवर उभी केली. शापसंभ्रमातला वैशम्पायन (अंक ६) हे थोडेसे तसल्या वर्गात पडणारे पात्र आहे. पूर्वजन्मीच्या अबोध संवेदनेमुळे पर्याकुल आणि विकारी भाषणापेक्षा अभिनयातूनच त्याची अवस्था व्यक्त होण्याजोगी आहे. त्यासाठी एखादा गणपतराव किंवा बाळाभाऊ वैशंपायनाचे काम करणारा पाहिजे.

## ९

बाणभट्टाच्या 'कादंबरी'ची नायिका कादंबरी हीच आहे. जवळ जवळ अर्धा ग्रंथ होईपर्यंत तिचे दर्शन होत नाही हे खरे. पण महाश्वेतेच्या तोंडून चंद्रापीडासमोर तिचा उल्लेख झाल्यापासून तीच कथेला व्यापून राहते व महाश्वेता बाजूला सरते. तिच्या मनोवस्थांची परोपरीची वर्णने करण्यात कल्पनाप्रभू बाणभट्टाने आपले कौशल्यसर्वस्व वेचले आहे. चंद्रापीडाबद्दल प्रथमदर्शनी तिच्या अल्लड निरागस अंतःकरणात उद्भवलेला अनुराग, त्याच्या उलट संकोच आणि लज्जा यांनी मनांत उत्पन्न केलेले द्वन्द्व, आईबापांची भीती आणि चंद्रापीडाची प्रीती यांच्यामध्ये मनाची चाललेली ओढाताण, जागेपणी, स्वप्नात, झोपेत चंद्रापीड दिसू लागल्यामुळे झालेली पर्याकुल अवस्था, चंद्रापीडाला उद्देशून मनाच्या उमाळ्याने निघत असलेले विनवणीचे उपालंभाचे उद्गार, अखेर तीव्र विरहाने झालेली तगमग. हे सर्व अशा भावपूर्ण कल्पनाशालिनतेने बाणभट्टाने वर्णिले आहे की कादंबरीची प्रेममूर्ती कायमचा आपल्या हृदयाचा कबजा घेते. कादंबरीचे हे चित्र बाणाने सुरुवातीस स्वतःच्या वाणीने आणि पुढे केयूरक आणि विशेषतः पत्रलेखा यांनी चंद्रापीडापुढे केलेल्या वर्णनातून उभे केले आहे. देवलांनी हे सर्व गाळले आहे. बाणभट्टाच्या बाजूने पाहता, 'कादंबरी'चे सारसर्वस्वच देवलांनी काढून फेकून दिले आहे असे म्हणावे लागेल. पण नाटकात ही वर्णने घालणे अशक्य होते. पत्रलेखा व चंद्रापीड यांचा प्रवेश घालून त्यात वर्णनांचा किंचित अंश आणला असता तरी तो प्रेक्षकांना असह्य झाला असता. तरी थोडीशी चुणूक देवलांनी अंक ५ प्र. ३ मध्ये दाखविली आहे. ती मनोरम आहे. कादंबरीच्या स्वप्नात चंद्रापीड येतो. तो तिच्याशी लगट करू लागतो तेव्हा

कादंबरी—ओरडलें किति मोठ्यानीं।
वदला विनोद हा रमणी ॥
ताडियलें मीं शब्दांनी ।
परि तो प्रेमचि तें मानी ॥
बसले, रागानें मौनीं ।
माझ्या लोळण घे चरणीं ॥
निंदा केली बहु मी त्याची ।
तरि तो ऐके स्तुति म्हणुनी ॥

मदलेखा—पण गडे, मला एक शंका येते. तो कुमार त्या मंदिरात आणि तू आपल्या मंदिरात; तेव्हा हे सगळे

त्याने केले तरी केव्हा? मी सारखी तुझ्याजवळ होते, मला नाही ग दिसला तो?
कादंबरी--हीच का शंका? अहाहा! अग शहाणे, स्वप्नात आलेला तुला ग कसा दिसेल?

मुळात पत्रलेखेच्या वर्णनात आलेला हा विनोदगर्भ शृंगारिक प्रसंग देवलांनी कादंबरी-मदलेखा यांच्या संवादात सहज सुंदर वाणीने गुंफिला आहे.

मूळ 'कादंबरी'मध्ये पत्रलेखेच्या पात्राचे प्रयोजन हेच दिसतेकी कादंबरीच्या अवस्थांची वर्णने चंद्रापीडाच्यापाशी करणे. चंद्रापीड उज्जयिनीला परत येतो तेव्हा पत्रलेखेला कादंबरीपाशी ठेवून येतो असे बाणाने वर्णिले आहे, ते याचकरिता. पण देवलांनी कादंबरीची वर्णने गाळली, तेव्हा पत्रलेखेच्या पात्राचे प्रयोजन नाहीसे झाले. पाचव्या अंकात ती उगीच थोडीशी येते. तिचे पात्र अजिबात गाळण्यास काही हरकत नव्हती.

महाश्वेतेसंबंधाने पूर्वी लिहिले आहे. तिच्या चारित्र्याचा एकेक पैलू क्रमाक्रमाने कसा उमटत जातो याचा योग्य स्थली निर्देश केला आहे. बाणाच्या 'कादंबरी'त कादंबरी नायिका असली तरी शापसंभ्रम नाटकाची नायिका महाश्वेता आहे हे उघड आहे. पण तिच्या बाबतीत चमत्कारिकपणा असा झाला आहे की सहाव्या अंकानंतर तिची भूमिका खंडित झाल्याप्रमाणे वाटते. ती एकदम मागे सरते ती अगदी अखेरीस नुसते तोंड दाखवायला पुंडरीकासह रंगमंचावर येते. त्याच्यापूर्वी तरलिकेच्या तोंडी तिला पार्वतीमातेने स्वप्नात सौभाग्यदान केल्याचा फक्त उल्लेख आहे. सातवा अंक कादंबरीला वाहिलेला आहे. प्रेम, पातिव्रत्य, वैराग्य, सौजन्य, तेज इत्यादी गुण प्रकट करणारे जिचे चारित्र्य नाटकभर प्रतिदर्शित केले त्या उदात्त नायिकेला तुटक अवस्थेत पृष्ठभूमीत सारून देणे हे नाट्याच्या दृष्टीने योग्य झाले नाही. वास्तविक, पुंडरीकाच्या चारित्र्याचे उन्नयन आणि त्याचे महाश्वेतेशी मीलन दाखविणारा एक प्रवेश शापसंभ्रमात अखेरीस घालायला पाहिजे होता. पण मूळ कादंबरीत तसे काही नाही; देवल तसे कसे करतील?

पुंडरीकाच्या व्यक्तिरेखेविषयी पूर्वी लिहिले आहे. मूळ 'कादंबरी'त तो जसा आहे तसाच शापसंभ्रमात उतरला आहे. सौंदर्यलोलुप, अतिकामी, उतावळा. नाटकाची नायिका महाश्वेता आहे म्हणून त्याला नायक म्हणायचे. तो तिसऱ्या अंकात मरण पावतो; तो सातव्या अंकाच्या अखेरीस पुनरुज्जीवित होऊन किंचित्काल रंगमंचावर येतो. मध्यंतरी निर्वेदनपर प्रवेशात त्याचे उल्लेख आहेत तेवढेच. 'कादंबरी' मध्ये हे ठीक असले तरी नाटकाच्या दृष्टीने हे वैरस्यकारक आहे.

बाणाच्या कृतीमध्ये कादंबरी ही नायिका म्हणूनच केवळ नव्हे, तर प्रामुख्याच्या दृष्टीनेही चंद्रापीड हा नायक ठरतो. 'कादंबरी'च्या आरंभापासून अखेरपर्यंत कथानकाची केंद्रभूत व्यक्ती म्हणून तो आपल्या डोळ्यांपुढे राहतो. शापसंभ्रमात तो अर्धामुर्धाच आपल्या दृष्टीस पडतो. महाश्वेतेच्या भेटीत एक सोज्वळ विनयशील तरुण म्हणून तो आपणांस दिसतो. कादंबरीच्या भेटीतही त्याची विनयशीलता त्याला सोडीत नाही. पुंडरीकासारखा तो अधीर तर नाहीच, उलट वाजवीपेक्षा अधिक शंकेखोर असतो. कादंबरीची प्रेमविव्हल अवस्था तो प्रत्यक्ष पाहतो, त्याचे स्वतःचे प्रेमही तिच्यावर दृढ बसले आहे, तरी संशय त्याचा पिच्छा सोडीत नाही. महाश्वेता जोपर्यन्त दुःखात आहे तोपर्यंत आपण अविवाहित राहायचे, हा कादंबरीचा निश्चय! त्यामुळे ती आपणांस वरील की नाही ही त्याच्या मनातली शंका. ही त्याची संशययुक्त अवस्था मूळ 'कादंबरी'तच आहे. तिच्यामुळे कादंबरीच्या प्रेमविव्हल अवस्थेच्या वर्णनांना जास्तीत जास्त वाव मिळतो. पण तसे काही वर्णन करण्याचा प्रसंग नसतानाही देवलांनी नाटकात त्याला संशयी बनविले आहे. मुळाचे केवळ अनुकरण!

नाटकात तो आपल्याला इतकाच दिसतो. पण 'कादंबरी'त जन्मापासूनचे त्याचे चरित्र आपण पाहतो. त्याचा अपूर्वाईचा जन्म, त्याचे बालपण, त्याचे उत्कृष्ट शिक्षण, त्याला शुकनाशाचा उपदेश, त्याचा दिग्विजय इत्यादी गोष्टी आपल्यासमोर येतात व त्याचे सौंदर्य, त्याचा विनय, आत्मविश्वास व पराक्रम या गुणांची आपल्याला ओळख होते. कादंबरीची भेट घेऊन परत उज्जयिनीला आल्यानंतर पुन्हा अच्छोद सरोवराला जाईपर्यंतच्या काळात त्याच्याच हालचालींनी 'कादंबरी'चे कथानक व्यापले आहे. त्यात त्याची प्रेमविव्हलता आणि शंकित मनःस्थिती, वडिलांविषयी संकोच आणि वैशंपायनाविषयी निःसीम प्रेम या मनोवस्था प्रकट होतात.

शापसंभ्रमात हे सर्व गाळले आहे; देवलांना गाळणे भागच पडले आहे. कादंबरीच्या प्रणयाला आवश्यक तेवढ्यापुरताच त्याला नाटकात आणला आहे. ही जर चंद्रापीडाची दशा तर त्याचे आईवडील तारापीड विलासवती,

अमात्य शुकनास व त्याची पत्नी मनोरमा यांचे अखेरीस केवळ नाममात्र दर्शन घडविले असल्यास त्यात नवल काहीच नाही. कादंबरीचे व महाश्वेतेचे आई-वडील अनुक्रमे चित्ररथ मदिरा व हंस गौरी यांचा मूळ ग्रंथातच नामोल्लेखाखेरीज व शेवटच्या प्रवेशाखेरीज काही भाग नाही. नाटकात अर्थात तसेच.

पुंडरीकाचा जिवलग मित्र तपस्वी कपिंजल याच्याविषयी पूर्वी उल्लेख केलाच आहे. महाश्वेता आणि कादंबरी यांच्या दासी अनुक्रमे तरलिका व मदलेखा. एकनिष्ठ आज्ञाधारकपणा व गोड भाषण यांखेरीज यांच्याविषयी सांगण्याजोगे काही नाही. इतर किरकोळ पात्रांचा उल्लेख न केला तरी चालण्याजोगे आहे.

शापसंभ्रम नाटकाचे जे दोष म्हणून आपल्याला भासतात त्यांपैकी बरेचसे अपरिहार्य होते. काही म्हटले तरी नाटक या वाङ्मयप्रकाराला मर्यादा पडतात. प्रचंड प्रमाणावर गाळागाळ अपरिहार्य होती. देवल म्हणूनच रचनेत इतका सुसंघटितपणा आणू शकले. कथानकातला प्रणयाचा भाग तेवढा त्यांनी निवडला हे त्यांच्या संगीत नाटक रचण्याच्या उद्देशास अनुरूप असेच झाले. देवलांचा उद्देश, प्रवृत्ती आणि मर्यादा लक्षात घेता जितके जास्तीतजास्त नीटनेटके व कलापूर्ण नाटक निर्माण होणे शक्य होते तितके शापसंभ्रम झाले आहे असा रसिकांचा अभिप्राय पडावा.

बाणाची प्रतिभाचातुरी अशी विलक्षण की अद्‌भुत अतिमानवी व्यक्ती निर्माण करूनही त्या सहजरीत्या मानवी भावभावनांनी हेलावत असलेल्या तो दाखवितो. दैवी चमत्कार दाखवूनसुद्धा प्रेम, करुणा इत्यादी मानवी मनोविकार आणि मानवी व्यवहार त्यात असे मिसळून देतो की ते संमिश्र रसायन अत्यंत रोचक व्हावे. देवलांनी ते रसायन जितके आपल्या पात्रात ओतून घेतले आहे तितकाच बाणाचा हा गुण उतरला आहेच.

संस्कृत काव्यवाङ्मयाचा विचार करता बाणाचा लक्षणीय गुण म्हणजे सोज्वळपणा. प्रणयप्रधान कथानक, शृंगाराची लयलूट असूनही उत्तान भडक वर्णने किंवा अश्लीलतासूचक कल्पना अथवा शब्दप्रयोग यांच्यापासून तो अलिप्त राहिला आहे. देवलांविषयी सांगायलाच नको. संयम हा त्यांचा स्थायी भाव होता. भाषा व कल्पना यांच्या बाबतीत सोज्वळपणा त्यांनी कधी सोडला नाही. शेवटच्या प्रवेशात चंद्रापीडाच्या देहाशी कादंबरीचा शृंगार वर्णिला आहे, त्यात उत्तानपणा नसला तरी वर्णनाची मात्रा जरा जास्तच आहे अंक १ प्र. १ मध्ये पुंडरीकाच्या दर्शनाने मोहित होऊन महाश्वेता एकदम म्हणते, " मग आता आलिंगन यायला उशीर का करावा. " हे उत्तानपणापेक्षा अनौचित्याच्या सदरात अधिक वाजवी रीतीने मोडेल.

देवलांची पद्धत लक्षात घेता बाणाच्या कादंबरीचे मराठीत जे अनुवाद झाले असतील त्यांचा त्यांनी किमान उपयोग करून घेतला असावा असा प्रश्न उपस्थित होतो. ऑथेल्लोवरून झुंजारराव तयार करताना त्यांनी महादेवशास्त्री कोल्हटकरांच्या भाषांतराचा उपयोग केला व मृच्छकटिकाचे रूपांतर करताना परशुरामपंत गोडबोले यांच्या भाषांतराचा उपयोग केला. बाणाच्या कादंबरीचा परशुरामपंत गोडबोले यांनी केलेला संक्षिप्त मराठी अनुवाद ' कादंबरीसार ' या नावाने १८७२ साली प्रसिद्ध झाला होता. त्याच्या पूर्वार्धाची दुसरी आवृत्ती इ. स. १८८६ साली प्रसिद्ध झाली. पांडुरंग गोविंदशास्त्री पारखी यांनी केलेले ' प्रायःभाषांतर ' कादंबरीसार याच नावाने १८९१ साली प्रसिद्ध झाले. पारखींच्या प्रस्तावनेवर तारीख १-५-१८९१ ही आहे. देवलांचे शापसंभ्रम या वेळेस बरेचसे रचून तयार झालेले असावे. तेव्हा त्यांनी पारखींच्या कादंबरीसाराचा आधार घेतला असणे संभवनीय नाही. त्यांनी उपयोग केला असेल तर तो गोडबोल्यांच्या भाषांतराचाच. पण या विषयीच्या शोधातून काही निष्पन्न होण्याजोगे नाही. किंबहुना असा शोध करणेही शक्य नाही. याला कारण बाणभट्टाची वर्णनशैली. कोणत्याही व्यक्तीचे, वस्तूचे वा घटनेचे वर्णन करायचे म्हणजे उपमाउत्प्रेक्षांनी खचलेल्या विशेषणांची प्रदीर्घ मालिका त्यात यायची हे बाणाच्या शैलीचे लक्षण ठरलेले. गोडबोले मूळ संस्कृतातील समास सोडवून मराठीत वाक्यखंडामध्ये त्याचा अर्थ मांडतात. त्यामुळे मजकूर वाढतो; मग ते मधलेच एखादे विशेषण किंवा विशेषणाचा तपशील गाळतात. देवलांना तर विशेषणमालिकेतले एखाद-दुसरेच विशेषण घेणे शक्य होते. बहुधा अशा विशेषणांचा आशय पदांमध्ये गुंफिला जातो. फारच झाले तर चार पाच कल्पना एका पदामध्ये जाऊ शकतात. अर्थसौलभ्य, पदलालित्य, रचनासौकर्य आणि मराठी माणसांसाठी औचित्य यांच्याकडे लक्ष देऊन देवलांना निवड करावी लागते. कल्पनांची निवड त्यांची स्वतःचीच. त्यांनी निवडलेले शब्द वेळेनुसार गोडबोल्यांच्या भाषांतरातले असतील, मूळ संस्कृततातले असतील किंवा या दोहोंतलेही नसतील.

महाश्वेता आईबरोबर अच्छोद सरोवरावर स्नानास आली असता तिला अतिमधुर सुगंध येतो. शापसंभ्रमात सुरवातीस सखींचा थट्टाविनोद संपल्याबरोबर लगेच हा प्रसंग आहे. मूळ संस्कृतात या सुगन्धाचे असे वर्णन आहे :

अथैकस्मिंश्च प्रदेशे झटिति वनानिलेनोपेतं निर्भरविकसितेऽपि कानने अभिभूतान्यकुसुमपरिमलं विसर्पन्तमतिसुरभितया अनुलिम्पन्तमिव पूरयन्तमिव तर्पयन्तमिव घ्राणेन्द्रियमहमहमिकया मधुकरकुलैरनुबध्यमानमनाघ्रातपूर्वममानुपलोकोचितं कुसुमगन्धमभ्यजिघ्रम्।

बाणभट्टाच्या वर्णनपद्धतीच्या मानाने हे अगदीच छोटे, यात फक्त सात विशेषके आहेत. यावर देवलांचे पद :

मधुर किती। कुसुमगंध सुटला ॥ धृ० ॥
त्या लोभें हे मधुकर पळती। गुंजारव उठला ॥
सकल फुलांचा परिमल सारा। काय एकवटला ॥
साच असावा सुरलोकींचा। भूवरि हा कुठला ॥

मुळातल्या सात विशेषकांपैकी 'अहमहमिकया मधुकरकुलैरनुबध्यमानम्' आणि 'अमानुपलोकोचितम्' या दोन विशेषकांचा स्थूल अनुवाद देवलांच्या पदात आला आहे. यात गोडबोल्यांच्या भाषांतराचा काही परिणाम दिसत नाही. 'कुसुमगन्ध' हा शब्द गोडबोल्यांच्या भाषांतरात नाही.

पुढे लगेच मुनिकुमार पुंडरीकाचे कल्पनासुंदर वर्णन मूळ संस्कृतात आहे. त्यात कवीचे कल्पनावैभव व्यक्त करणारी ३० विशेषके आहेत. देवलांनी इथे जे पद केले आहे त्याचे प्रथमार्ध :

हा काम म्हणू तरी त्यास। जाळी शिव कोपुनी ॥
तत्तनुचा होय विनाश। ऐसें वदती जनीं ॥
स्मरमित्र वसंतचि खास। विरहें मनिं पोळुनी ॥

हे मुळातल्या 'हरनयनहुताशनेन्धनीकृत मदनशोकविधुरं वसन्तमिव तपस्यन्तम्' या एका विशेषकाचे फैलावलेले रूपांतर आहे. पदाचे उत्तरार्ध

जटाभार शिरिं करी कमंडलु वल्कल करि परिधान हा, अक्षमाल धरि वनीं संचरे। यौवनरूपनिधान। मुनिचें व्रत पाळुनी ॥

यात पुढील काही विशेषकांमध्ये वर्णिलेल्या जटा वगैरे संभाराचा उल्लेख केला आहे. मुळातली तीस विशेषके यथास्थित रीतीने अनुवादित करायची म्हटल्यास देवलांना पुण्डरीकवर्णनाची पंचवीस पदे करावी लागली असती.

चौथ्या अंकाच्या २ ऱ्या प्रवेशाच्या सुरुवातीस चंद्रापीड अच्छोद सरोवराचे वर्णन करतो.

धवलचंद्रिकाच काय पूर्ण सांचली।
सत्पुण्यें अथवा जलरूप पावलीं ॥ धृ० ॥
स्फटिकशिलामंदिर हें काय भूमिचें।
कीं द्रवलें विमलहास्य चंद्रमौलिचें।
विरघळले शुभ्र मेघ काय शरदिंचे।
कीं निर्मळ साधुमनें सकळ वितळलीं ॥ १ ॥

यातल्या सर्व कल्पना मुळात आहेत. याच काय, आणखी कितीतरी रम्य कल्पनांनी मुळातले सरोवराचे वर्णन भरगच्च भरले आहे. शापसंभ्रमात सर्वत्र अशीच स्थिती आहे. मोठ्या भरलेल्या हौदातले बादलीभर पाणी घ्यावे तसा प्रकार आहे. त्यात देवलांनी इकडचे तिकडे, तिकडचे इकडे असे कुठे कुठे केले आहे. पण 'बाणोच्छिष्टं जगत्सर्वम्' असे म्हणतात त्या उक्तीचे येथे स्मरण होते.

असे हे देवलांचे शापसंभ्रम. 'कादंबरी'सारख्या अचाट रामणीयकमहानिधीतून अवचयन करून रचलेले. जाहिरातीतील शर्तीनुसार लिहून बक्षीस मिळवावे हे प्रवृत्तिनिमित्त होतेच. या प्राथमिक उद्देशाबरोबर सुंदर वाङ्मयकृती आणि प्रयोगक्षम संगीत नाटक निर्माण करावे हे उद्देश होतेच. या उद्देशांमुळे आणि मूळ ग्रंथाच्या स्वरूपामुळे हे दुपाखी प्रणयप्रधान संगीत नाटक बनले : चित्तवेधक आणि कंटाळवाणे, गोड गाण्याची मेजवानी देणारे आणि संगीताचे अजीर्ण करविणारे, मधुर संवादांनी भरलेले आणि विरस करणाऱ्या काही भागांनी डागळलेले! किर्लोस्कर सं. ना. मंडळीने हे रंगभूमीवर आणले. सुरुवातीच्या काळात भाऊराव कोल्हटकर–पुंडरीक, चिंतोबा गुरव–महाश्वेता, कृष्णराव गोरे–कादंबरी, केशवराव वडोदेकर–चंद्रापीड, नारायणराव दडपे–कपिंजल याप्रमाणे भूमिका करीत असत. या संचात हे खूप लोकप्रिय झाले. 'अशी उत्तम उत्तम पात्रे किर्लोस्कर कंपनीत असल्यामुळे शापसंभ्रमावर तिने महाराष्ट्र लुटले' असे देवलांचा मृत्युलेख लिहिणाऱ्या एका माहितगाराने म्हटले आहे. सुमारे १७–१८ वर्षे हे रंगभूमीवर चांगले चालत होते. नंतरच्या काळात नाना जोगळेकर आणि बालगंधर्व यांची अनुक्रमे पुंडरीक व महाश्वेता यांच्या कामाबद्दल प्रसिद्धी होती. खाडिलकरांच्या 'मानापमाना'ने संगीताचा नवा जमाना सुरू केला तेव्हा हे मागे पडले.

• • •

अनुक्रमणिका

# राजवाडे-ज्ञानदेवीतील दोन लक्षणीय पाठभेद

अरविंद मंगरूळकर
विनायक मोरेश्वर केळकर

१ :

> जे श्रुतित्रयीतें जाणौनि। शतवेन्हीं यज्ञां करूनि
> यजिलेया ही मातें चुकउनि। स्वर्गु **वशांति** -
>
> ९·३०७.
>
> — राजवाडे-पाठ.

**अर्थ** : जे तीन वेदांचे अध्ययन करून, शंभरापर्यंत यज्ञ करून मला आराधिल्यावरही (मला) डावलून स्वर्गाची कामना करितात.

> जे श्रुतित्रयातें जाणोनि। शतवरी यज्ञ करूनि
> यजिलिया मातें चुकोनि। स्वर्गु **वरिता** ३१०.

**अर्थ** : कारण की, त्यांनी ऋग्वेदादी तिन्ही वेदांना जाणून, शंभरपर्यंत यज्ञ करून माझे आराधन केले असता मला अजिबात विसरून ते स्वर्गच पसंत करितात.

— शं. वा. दांडेकर.

वर उद्धृत केलेली ओवी भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायातील 'त्रैविद्या मां सोमपाः' इत्यादी २०-व्या श्लोकावरील व्याख्यानात ज्ञानदेवीत आलेली आहे. राजवाडे-प्रतीतील ओवीत चौथ्या चरणात जो '**वशांति**' हा पाठ आहे, तोच प्रस्तुत लेखाच्या मथळ्यात निर्देशिल्यांपैकी पहिला लक्षणीय पाठ होय. त्या पाठाविषयी सविस्तर विवेचन पुढीलप्रमाणे :

'वशांति' हे 'वश्' या धातूचे वर्तमानकालाचे तृतीय-पुरुषाचे अनेकवचनी रूप आहे आणि तो धातू 'वश्' या संस्कृत धातूपासून आलेला आहे. 'वश्' हा धातू वैदिक आहे. बहुधा त्याचा अर्थ न कळल्याने अन्य सर्व प्रतींत 'वरिती' असा सुगमीकृत पाठ केलेला आहे. फक्त राजवाडे-प्रतीत आणि प्रा. फाटकांजवळ पूर्वी असलेल्या दुर्मिळ प्रतीत 'वशांति' असा पाठ आहे. या दोन (राजवाडे आणि फाटक यांच्या) प्रतींतील बहुसंख्य पाठ हे नेहमीच एकमेकांशी मिळते-जुळते आहेत, हे लक्षात घेण्यासारखे आहे. विशेषतः मोक्याच्या स्थळी ते नेहमी सारखे असतात. त्यामुळे या दोन प्रती एका बाजूला, आणि अन्य सर्व प्रती दुसऱ्या बाजूला, असे दृश्य अनेकदा दिसते. याच कारणास्तव प्रा. द. वा. पोतदारांनी या प्रती 'बहिणी-बहिणी' असाव्या, असे म्हटले आहे. प्रस्तुत स्थळीही हेच दृश्य दिसते. माडगांवकरांच्या प्रतीत तर टीपेत 'इच्छिताति' असा सर्वांत सुगम पाठ केला आहे. धनेश्वरांनी राजवाडे-पाठ घेऊन अन्य प्रतींतील 'वरिती' याचा 'पसंत करितात' हाच अर्थ दिला आहे! यावरून राजवाडे-पाठ हा कसा प्राचीन आहे, आणि ज्ञानदेवकालीन भाषा परिचयलोपाने न समजल्यामुळे राजवाडे-पाठात कसे अनधिकृत बदल केलेले आहेत, याची स्वच्छ जाणीव होते. 'वश्' धातू ज्ञानदेवीत फक्त येथेच आलेला आहे. अर्थात त्याच्या अर्थास मूलज्ञानावाचून दुसरा आधारच नाही. परंतु धातूच्या मूलज्ञानाचा प्रयत्नच करून न घेतल्याने गतानुगतिकपणाने सर्व संपादकांनी आणि कोशकारांनी अर्थ केलेले आहेत. बहुधा या स्वकल्पित अर्थाचे मूळ ग. कृ. आगाशे हे असावे. त्यांनी '**वशांति** – विंशति.संस्कृत शब्दाचे अपभ्रंशरूप', असे एकदा म्हणून टाकिले; त्याचाच अनुवाद इतर सर्वांनी केला. कोणीही स्वतंत्र विचारही केला नाही; किंवा राजवाड्यांनी परिश्रमाने संपादिलेल्या स्वतंत्र नवव्या अध्यायाचे परिशीलनही केले नाही. प्रस्तुत नववा अध्याय राजवाड्यांनी जरी अगोदर संपादून ठेविलेला असला, तरी त्याचे प्रकाशन मात्र १९३४-च्या जानेवारी महिन्यात (अर्थात राजवाड्यांच्या मृत्यूनंतर) झालेले आहे आगाशांची 'श्रीज्ञानेश्वरी टीका' (प्रस्तुत नववा अध्याय ज्यात समाविष्ट आहे तो खंड) १९२४ साली प्रकाशित झाली. (आगाशांचे खंड क्रमशः प्रसिद्ध होऊन १९३३

सालच्या अखेरीस त्यांच्या प्रकाशनाची समाप्ती झाली, हे येथे लक्षात घ्यावे. ) तेव्हा राजवाड्यांचा नववा अध्याय त्यांनी पाहिला नाही, हे उघड आहे. परंतु पंगु- कुलकर्णी वेलिंगकर यांनी तरी निदान तो पहावयाला हरकत नव्हती. पण तसे झालेले नाही. पंगु-कुलकर्णी यांनी आगाशांचाच 'प्रवेशतात' असा चुकीचा अर्थ दिला आहे. रा. ना. वेलिंगकरांनी वस्तुतः आपल्या पद्धतीप्रमाणे 'वशणें' असे धातुरूप यावयास हवे होते. पण त्यांनी आपल्या कोशात 'विशंति' असेच तृतीयपुरुषाचे अनेकवचनी रूप दिलेले आहे; आणि अर्थाबाबत आगाशांचीच री ओढली आहे. भावे यांनी आपल्या कोशात हा शब्दच दिलेला नाही. बहुधा, तो अनवधानाने दिला नसावा. महाराष्ट्र-शब्द-कोशातही तो दिलेला नाही. परंतु राजवाड्यांनी मात्र आपल्या धातुकोशात 'वश् [ वश् २ कांतौ ] इच्छा करणें' हा धातू दिलेला आहे. अर्थात राजवाडे वगळिता आणि आचार्य वि. प्र. लिमये यांनी त्याचा आपल्या प्रतीवर समासात जो 'wish' असा अर्थ दिलेला आहे तो सोडता, सर्वांचा अर्थ ठार चुकलेला आहे. गीताश्लोक ९·२० यातील 'स्वर्गतिं प्रार्थयन्ते' याचे 'वशंति' हे व्याख्यान आहे हे लक्षात घेतले, तर 'वशंति (=कामना करितात) हाच पाठ सरळ, सयुक्तिक आणि मूळचा आहे, हे स्पष्ट आहे. तात्पर्य, ज्ञानदेवीतील हे स्थळ राजवाडे-पाठाचे पुराणत्व आणि अर्थानुकूलत्व ह्या दृष्टींनी तर महत्त्वाचे आहेच, पण व्याकरणाच्या ज्ञानावाचून संपादक कसे फसतात, याही दृष्टीने ते उद्बोधक आहे.

* * *

## २ :

भगवद्गीतेच्या अठराव्या अध्यायात 'अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधं' इत्यादी १४-व्या श्लोकात मनुष्यमात्राच्या सर्व कर्मांच्या सिद्धीची पाच कारणे कथन केलेली आहेत. 'विविधाश्च पृथक्चेष्टाः' हे त्यातील चौथे कारण आहे. त्याचे व्याख्यान ज्ञानदेवांनी ३२९–३४१ या ओव्यांमध्ये केले आहे. त्या ओघात पंचप्राणांच्याही व्यापारांचे आणि स्थानांचे वर्णन त्यांनी ३३४–३३८ या ओव्यांत केले आहे. त्यात समान वायूचे वर्णन करीत असता (३३७–३३८) ३३८ या ओवीमध्ये 'नाभि' असा शब्दप्रयोग फक्त राजवाडे-प्रतीतच आलेला आहे. लक्षणीय असा दुसरा पाठभेद तो हाच होय. त्या ओव्या आणि त्यांचा अर्थ असा :

आरोगिलेन रसें । शरीर भरी सरिसें
**नाभि** न संडितां असे । सर्वसंधी ३३७.
ऐसिया इया राहाटी । मग ते चि क्रिया पाठीं
समानु ऐसें किरीटी । बोलिजे गा ३३८.
— राजवाडे-पाठ.

**अर्थ :** नंतर (जी प्राणक्रिया) सेविलेल्या रसाने शरीर सारखेपणाने भरते, (आणि) नाभिप्रदेश न सोडिता सर्व संधिभागांच्या ठिकाणी असते; हे अर्जुना, अशा ह्या व्यवहारामुळे तीच क्रिया मग 'समान' म्हणून म्हटली जाते.

आरोगिलेनि रसें । शरीर भरी सरिसें
**आणि** न सांडितां असे । सर्वसंधीं ३३९.
ऐसिया इया राहटी । मग तेचि क्रिया पाठीं
समान ऐसी किरीटी । बोलिजे गा ३४०.
— दांडेकर.

**अर्थ :** भक्षण केलेल्या सर्व रसाने शरीर सारख्या प्रमाणाने ती भरते व कोणत्याही सांध्याचा त्याग न करता सर्व सांध्यांमध्ये ती भरलेली असते. अर्जुना, अशा या व्यापारामुळे मग नंतर त्याच क्रियेला 'समान' असे म्हणतात.

फाटक यांच्या जवळील प्रतीत 'नाभि' याच्या जागी 'आणि' असा पाठ आहे. इतरही सर्वच प्रतींत 'आणि' असाच पाठ आहे. परंतु 'आणि' या पाठाचे मर्म ध्यानी येत नाही. 'आणि सर्वसंधीं न सांडितां असे' या फाटक-प्रतीसकट अन्य प्रतींतल्या पाठामध्ये एक मोठा दोष आहे. तो असा की, 'सांडितां' हे सकर्मक पद असूनही त्याला पाठात कर्म उपलब्ध होत नाही. दांडेकरांनी "...व कोणत्याही सांध्याचा त्याग करता सर्व साध्यांमध्ये ती भरलेली असते," असा अर्थ केला आहे. (त्यांच्या व्यतिरिक्त इतरांनी केलेला अर्थ हा तर निरर्थकच आहे.) पण दांडेकरांच्या अर्थात विसंगती आहे. आणि द्विरुक्तीही आहे. 'कोणत्याही सांध्याचा त्याग न करता सर्व सांध्यां-मध्ये असते' म्हणजे काय? त्यांना इतकेच म्हणावयाचे असावे की, 'सर्वच्या-सर्व साध्यांमध्ये ती असते.' पण दुष्ट पाठाच्या कैचीत सापडल्यामुळे त्यांना वरीलप्रमाणे विचित्र अर्थ करावा लागला आहे. अर्थावरून असे उघड दिसते की, दांडेकरांनी एकदा 'सर्वसंधी' हे पद 'सांडितां'

याचे कर्म म्हणून घेतले आहे, आणि दुसऱ्यांदा ते सप्तम्यन्त पद घेऊन 'असे' याशी अन्वित केले आहे. व्याकरणदृष्ट्या हे विलक्षण आणि अर्थदृष्ट्या अनभिप्रेत आहे. वस्तुतः, 'सर्वसंधी' हे सप्तम्यन्त अनेकवचनी पद आहे, आणि ते 'असे' या क्रियापदाशी अन्वित करावयाचे आहे. त्यामुळे दांडेकरांना अभिप्रेत वाटणारा अन्वय विसंगत आहे. उलटपक्षी, 'नाभि न संडितां सर्वसंधी असे' या राजवाडे-पाठात अशी द्विरुक्ती नाही हे एक, आणि 'संडितां' या सकर्मक पदाचे 'नाभि' हे पद सरळपणे कर्म होते, आणि त्यायोगे अर्थनिष्पत्तीही योगशास्त्रानुसार उत्तम प्रकारे होते. आता, 'नाभि न संडितां' असे येथे 'समान'-प्राणाच्या संदर्भात म्हणण्याचे प्रयोजन काय? 'नाभि' हे शरीरान्तःसंचारी 'समान' या वायूचे वसतिस्थान आहे, असे उपनिषदादिकांमध्ये आणि योगशास्त्रातही सांगितले आहे. पाहा : पायूपस्थेऽपानं चक्षुःश्रोत्रे मुखनासिकाभ्यां प्राणः स्वयं प्रातिष्ठते **मध्ये तु समानः**। प्रश्नोपनिषद, ३-५; यावरील शंकराचार्यांचे भाष्य – "मुखनासिकाभ्यां मुखनासिके मुखं च नासिका च ताभ्यां मुखनासिकाभ्यां निर्गच्छन् प्राणः स्वयं सम्राट्-स्थानीयः प्रातिष्ठते प्रतितिष्ठति । **मध्ये तु प्राणापानयोः स्थानयोः नाभ्याम्**। समानोऽशितं पीतं च समं नयतीति समानः।" शांकरभाष्य. '**समानो नाभिमण्डले**।' अमरकोश.

हृदि प्राणः स्थितो नित्यमपानो गुदमण्डले ॥ २३-उत्तरार्ध.

**समानो नाभिदेशे** तु उदानः कण्ठमध्यगः ।
व्यानः सर्वशरीरे तु प्रधानाः पञ्च वायवः ॥ -२४.

योगचूडामण्युपनिषद.

तसेच, पाहा : (१) सर्वांगी व्यान **नाभीं समान**।
कंठीं उदान गुदीं अपान ।
मुखीं नासिकीं प्राण ।
नेमस्त जाणावा ।

दासबोध : १७·८·१२.

(२) पातञ्जल-योगदर्शन : कृष्णाजी केशव कोल्हटकर : पृष्ठ ४३०.

(३) आत्ममीमांसा : भाऊशास्त्री वझे : पृष्ठ २६.

(४) षट्चक्रभेदन : श्री. म. वैद्य : पृष्ठ ९५.

प्रस्तुत ओवीच्या पाठाबाबत लक्षणीय हे की, 'नाभि' हा पाठ फक्त राजवाडे-प्रतीतच आहे. फाटक-थिगळे प्रतींतही तो नाही, हे विशेषच लक्षात घेण्यासारखे आहे. असे असता इतका महत्त्वाचा आणि साभिप्राय पाठ सरकारी राजवाडे-प्रतीत त्याज्य मानिला जावा, हे किती अविवेकाचे आहे, ते ध्यानी येईल. या वाह्यतः लहान पण अर्थतः अत्यंत महत्त्वाच्या पाठावरून राजवाडे-प्रतीचे महत्त्व स्वयमेव सिद्ध होते. कारण अन्य सर्व प्रतींतले पाठ निरर्थक ठरतात, आणि केवळ राजवाडे-प्रतीतील पाठ हाच सार्थ आणि ग्राह्य ठरतो.

• • •

# परीक्षणे

## प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास

आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास दोन खंडांत ग्रथित केल्यानंतर डॉ. अ. ना. देशपांडे आता प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास सांगायला प्रवृत्त झाले आहेत. त्या संकल्पित इतिहासातील प्रस्तुत ग्रंथ हा पहिल्या खंडाचा केवळ पूर्वार्ध.—हाही उण्यापुऱ्या पाचशे पृष्ठांचा झाला आहे; आणि यात देशपांडे महानुभावअखेर आले आहेत. एका व्यक्तीने असा समग्र मराठी वाङ्मयाचा इतिहास अक्षरनिबद्ध करण्याचा संकल्प करावा आणि तो बराचसा सिद्धीसही नेत आणावा हे निःसंशय भूषणास्पद आणि स्पृहणीय आहे. संस्थांपेक्षा व्यक्तीनेच असे महत्संकल्प सोडून त्यांची पूर्तता करावी या मराठी परंपरेला हे धरूनही आहे !

आजपर्यंत मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिण्याचे अनेक उपक्रम झाले; त्यांतील काही, काही मर्यादेपर्यंत सिद्धीसही गेले. या इतिहास-ग्रंथांचे आपापल्या परीने महत्त्वही आहे. पण या वाङ्मयेतिहासकारांना साहित्य-साधनांच्या संशोधन-संकलन-संपादनाचेही काम करावे लागले. त्यामुळे त्या ग्रंथांचे स्वरूप अनेकदा माहितीपर, परिचयपर असे होणे अटळ झाले. आता प्रायः ती अवस्था संपली आहे. ज्ञात वा परिचित साहित्याचे विशिष्ट दृष्टिकोणातून घडवलेले दर्शन किंवा केलेले समीक्षण व चिकित्सा अशा अवस्थेत वाङ्मयेतिहास-लेखकाने प्रवेश केला आहे. देशपांड्यांच्या इतिहासाने या अवस्थांतराची सुरुवात केली आहे.

एका व्यक्तीने असा बृहदितिहास लिहावा याला आणखीही एक महत्त्व आहे. अनेकांनी सिद्ध केलेल्या वाङ्मयेतिहासापेक्षा एकाच व्यक्तीने लिहिलेल्या वाङ्मये-तिहासात असा सलग, निश्चित दृष्टिकोण प्रतीत होणे हे केव्हाही अधिक शक्य. देशपांड्यांच्या इतिहासाचे वैशिष्ट्य आहे ते यामध्ये. एका निश्चित दृष्टिकोणातून त्यांनी या वाङ्मयेतिहासाची मांडणी केली आहे. आरंभीच्या निवेदनात स्वतः देशपांड्यांनीच हे सूत्र स्पष्ट करून सांगितले आहे. तेथे ते लिहितात, " प्राचीन मराठी वाङ्मयाकडे पाहण्याची एक वेगळी दृष्टी आपण मांडावी, या वाङ्मया-वर आपल्या स्वतंत्र दृष्टिकोणातून नव्या समीक्षणाचा संस्कार आपण करावा अशी आर्त अनावर स्वरूपात माझ्या ठिकाणी उत्पन्न झाली......एक विशिष्ट भूमिका स्वीकारून प्राचीन मराठी वाङ्मयाचे समालोचन करण्याचा मी हा प्रयत्न करीत आहे. ही भूमिका मांडणे ही माझ्या मते आजच्या काळाची निकड आहे. विज्ञानदृष्टी नव्हे, राष्ट्रदृष्टी नव्हे, व्यवहारदृष्टी नव्हे, तर संतस्ट [ द ? ] ष्टीच फक्त मानवाला आजच्या काळी तारावयाला समर्थ आहे. या श्रद्धेवर ही भूमिका आधारलेली आहे. "

प्रस्तुत भाग प्रसिद्ध होण्यापूर्वी आठ-नऊ वर्षे " आधुनिक मराठी वाङ्मयाच्या इतिहासा "च्या दुसऱ्या भागाचा समारोप करताना देशपांडे यांनी जी 'श्रेयार्थी साहित्य-दृष्टी 'ची भूमिका सांगितली होती[1] त्या भूमिकेचाच हा विकास किंवा विस्तार आहे.

वाङ्मयाचा इतिहास हा वाङ्मयसापेक्षच असला पाहिजे. त्यात वाङ्मयीन दृष्टिकोणच प्रधान हवा. पण जेव्हा वाङ्मयाची निर्मिती अशा हेतूने झालेली नसते तेव्हा त्या निर्मितीमागील हेतू जाणून घेऊन त्या अन्वये त्या निर्मितीचे विवेचन करणे आवश्यक होते. " प्राचीन मराठी वाङ्मय, हे प्राधान्याने संतांचे संतप्रकृती व्यक्तीचे वाङ्मय आहे. " (पृ. १०६) हा देशपांडे

---

खंड १, पूर्वार्ध. डॉ. अ. ना. देशपांडे व्हीनस प्रकाशन, पुणे, ऑगस्ट १९६६. पृ. १६+५२२. मूल्य २० रु.

१. 'वाङ्मयसमीक्षेत सामाजिकतेचे मूल्य टाळणे वा त्याला गौण लेखणे म्हणजे वाङ्मयनिर्मिती व वाङ्मया-स्वाद या प्रक्रियांच्या खऱ्या स्वरूपाविषयी अज्ञान प्रकट करण्यासारखे आहे.' (" आ. म. वा. इति. " भा० २ पृ. ८०७)

'परतत्त्वस्पर्शाने प्राप्त होणाऱ्या शांतिरसाच्या पुरस्कारात या श्रेयार्थी साहित्यदृष्टीचा परमोत्कर्ष आहे.' (कित्ता पृ. ८०८.)

यांचा निर्णय आहे, आणि त्याप्रमाणेच त्यांनी त्याचे विवेचन केले आहे.

प्रस्तुत वाङ्मयेतिहासाच्या या एवढ्या पाचशे पानांच्या भागामध्ये मराठी वाङ्मयाच्या आरंभापासून तो महानुभाव वाङ्मयापर्यंत तेवढा इतिहास आलेला आहे. या ग्रंथाचा निम्मा भाग–म्हणजे एकूण चार प्रकरणांपैकी दोन प्रकरणे या वाङ्मयनिर्मितीमागील पार्श्वभूमी स्पष्ट करण्यामध्ये, आणि महाराष्ट्राची भौगोलिक, ऐतिहासिक जडणघडण कशी होत गेली, मराठी भाषेचा जन्म आणि तिचा विकास कसा झाला, या वाङ्मयाची पूर्वपरंपरा कोणती इत्यादी सांगण्यामध्येच खर्ची पडला आहे. या एका ग्रंथाच्या संदर्भात तरी हा विस्तार प्रमाणापेक्षा जास्त वाटतो. एकूण योजनेच्या पूर्ण स्वरूपात तो कदाचित तसा वाटणारही नाही.

तिसऱ्या प्रकरणात "आद्यकविकीर्ति मुकुंदराज" आणि त्यांचा 'विवेकसिंधु' हा ग्रंथ यांचा परिचय आहे. मुकुंदराजाची भूमिका ही प्राधान्याने कवीची नसून ब्रह्मनिरूपणकाराची आहे, आणि, 'विवेकसिंधु' हा कवितारतीचे विलासवन नव्हे, तर तो योगेश्वराचा आश्रम आहे असे देशपांडे यांनी सांगितले आहे मुकुंदराजाच्या चरित्राविषयी आणि त्याच्या वाङ्मयाविषयी जे स्थल, काल इत्यादीविषयक अनेक प्रश्न निर्माण झालेले आहेत, त्यांचा सविस्तर आणि साधार ऊहापोह त्यांनी या प्रकरणात केला आहे. रूढ समजुतीप्रमाणे देशपांडे यांनी मुकुंदराजाचा अंतर्भाव या ग्रंथात ज्ञानेश्वरपूर्वकालात केला आहे खरा, पण त्यांचे स्वतःचे मात्र या बाबतीत वेगळे मत असावे असे याच प्रकरणातील एकदोन ठिकाणच्या उल्लेखांवरून वाटते. हे उल्लेख तसे संदिग्ध, अपुरे आहेत. या बाबतीत देशपांडे स्पष्ट विधाने करीत नाहीत; पण मोघम सुचवून मात्र जातात.[२] अशा रीतीने रूढ मतापेक्षा वेगळे असे स्वतःचे मत असेल तर त्याचे स्पष्ट, पुरेसे मंडन न करता काही संदिग्ध, मोघम विधाने करणे, आणि एकूण विवेचनात रूढ मताचा अनुवाद करणे हे कितपत इष्ट, अशा प्रसंगी लेखकाने कोणता मार्ग अनुसरावा ह्या प्रश्नाचा विचार करणे या निमित्ताने आवश्यक झाले आहे.

याच प्रकरणात 'स्थलकालातीत अशा परमात्म्याशी जेथे एकरूप व्हावयाचे आहे तेथे स्थलकालाच्या चर्चेत कसले स्वारस्य राहणार आहे?' (पृ. ३१०) अशासारखे जे उद्गार देशपांडे यांनी काढले आहेत त्यावरून या वाङ्मयेतिहासकाराच्याच मनात वाङ्मयेतिहासलेखनाच्या आवश्यकतेबद्दल शंका आहे की काय असे वाटू लागते.

चौथे प्रकरण 'श्रीचक्रधरोक्त परमार्ग आणि त्याची साहित्यसाधना' यांची ओळख करून देणारे आहे. 'तेरावे शतक हा मराठी भाषेच्या वाङ्मयीन वैभवाच्या उत्कर्षाचा काळ. हा उत्कर्ष घडवून आणण्याचे श्रेय फार मोठ्या प्रमाणात परमार्गाला देणे आवश्यक आहे.' (पृ. ४१८) या परमार्गातील (किंवा महानुभाव संप्रदायातील) इतर महत्त्वाच्या व्यक्ती, त्यांचे गद्यपद्य वाङ्मय यांचा परिचय विस्ताराने या प्रकरणात करून दिला आहे. महानुभाव संप्रदायाबद्दलच्या अनेक वादविषयांचा या प्रकरणात विस्तारशः परामर्श घेतला आहे.

डॉ. देशपांड्यांच्या या इतिहासाचे वैशिष्ट्य त्यात त्यांच्या प्रकट झालेल्या दृष्टिकोणात आहे हे खरे; पण हा दृष्टिकोण आजवरच्या परिचित दृष्टिकोणापेक्षा वेगळा आहे, आणि निःसंशय विवाद्य होणारा आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे आजवरचे वाङ्मयेतिहास 'ब्राह्मणी, वैदिक दृष्टिकोणातून लिहिले गेले आहेत. आजपर्यंत या देशात निवृत्तिवादी आर्येतर आणि वैदिकधर्मी, प्रवृत्तिवादी, आक्रमक, हिंसक आर्य यांचा शेकडो सहस्र वर्षे झगडा चाललेला आहे. आर्य संस्कृती, आर्य वाङ्मय हे नेहमीच लोकविन्मुख, स्वार्थैकदृक राहिलेले आहे. हेमाद्री आणि चक्रधर यांच्यातील विरोधाचे विवेचन करताना देशपांडे लिहितात, 'सामाजिक विषमतेचे आणि ब्राह्मण्याचे पोषण करणारा असा हेमाद्रिपुरस्कृत वर्णाश्रमधर्म आणि 'सर्वाधिमत्व ब्राह्मणत्व' असे सांगणारा व 'महारवाडौनि धर्म काडावा' असा श्रीचक्रधरमुखाने आदेश देणारा महानुभावपंथ यांच्या एकत्र येण्यातून विरोधाची ठिणगी उडाली हे स्वाभाविक आहे, अपरिहार्य आहे. हा या देशातला पुरातन, प्राचीनतम काळापासून सतत, अव्याहत, आजतागायत सुरू असलेला संघर्ष आहे.' (पृ. १७७). संस्कृत साहित्य आणि साहित्यशास्त्र यांवर त्यांनी जळजळीत टीका केली आहे. संस्कृत भाषा आणि साहित्य

२. पृ. ३०९ वर ते लिहितात. 'नवरसाच्या माध्यमातून परमार्थाची सुरस मांडणी करणाऱ्या पद्धतीचा मुकुंदराजांनी...... जो जळजळीत निषेध केला आहे तो फार सूचक आहे. या निषेधाचें लक्ष्य श्रीज्ञानेश्वर असावे असे, का कुणास ठाऊक, अनुमानावेसे वाटते.'

यांचा जयस्तंभ लोकद्रोहाच्या भूमीत गाडलेला आहे. या देशातील साहित्यात, संस्कृतीत उच्चवर्णनिष्ठ आणि लोकनिष्ठ अशा दोन परंपरा चालत आल्या आहेत. त्यांतील संस्कृत साहित्याच्या परंपरेची बेजबाबदार समाजदुष्ट विश्रांतिवादात परिणती झाली; साहित्यातील दुसरी परंपरा ही जीवनोन्मुख राहिली. ( पृ. ३७-३९. ) काही संतश्रेष्ठांनी मराठीला जवळ केले ते संस्कृतला आव्हान देऊन आणि लोकोद्धाराच्या जिवंत तळमळीने प्रेरित होऊन. विशेषतः या ग्रंथाच्या पहिल्या 'पार्श्वभूमी' या प्रकरणात देशपांड्यांचा हा दृष्टिकोण अत्यंत आग्रहीपणाने, जळजळीतपणाने, काहीशा कडवटपणानेही प्रकट झाला आहे, आणि त्याची छाया समग्र ग्रंथावर राहिली आहे. ग्रंथाच्या प्रास्ताविक निवेदनात देशपांडे यांनी आपली भूमिका मोठ्या नम्रपणाने मांडली आहे. पण प्रत्यक्ष ग्रंथांतर्गत विवेचनात मात्र आर्यत्वाचा, प्रवृत्तिवादाचा धिक्कार आणि प्रेमधर्मी, निवृत्तिपर, अहिंसावादी तत्त्वचिंतनाचा पुरस्कार त्यांनी अत्यंत आवेशाने केला आहे.

वाङ्मयेतिहासाला महत्त्व येते ते समालोचकाच्या दृष्टिकोणामुळे हे खरे. पण तात्त्विक दृष्टिकोण वेगळा आणि वैयक्तिक अभिनिवेश वेगळा. अशा वैयक्तिक अभिनिवेशामुळे प्रत्यक्ष वाङ्मय दूषित होण्याचा धोका संभवतो; आणि प्रस्तुत ग्रंथाच्या बाबतीत काही ठिकाणी तसे झाले आहे. या इतिहासाच्या प्रस्तुत भागात ज्ञानेश्वरांसंबंधीचे विवेचन नाही. पण काही ठिकाणी त्यांच्यासंबंधाने जो अभिप्राय सूचित झालेला आहे त्यावरून त्यांच्यासंबंधाने पुढील भागात कशा तऱ्हेचे विवेचन येणार याविषयी शंका निर्माण होते. 'दुष्ट व दुरात्मा' रामदेवराव यादवावर ज्ञानदेवांनी आपल्या अमृतवाणीचे अभिसिंचन करावे ही घटना देशपांडे यांना बरीचशी रहस्यमय वाटते. रामदेवरावाचा सचीव हेमाद्री आणि ज्ञानदेव यांच्यांत काही जातीय साम्य, दैवतविषयक साम्य दाखवून 'हे साम्य केवळ योगायोगाचे की त्यात काही सामाजिक अर्थ शोधला जावा इतक्या पात्रतेचे ?' असा प्रश्न करून त्यांनी तो तसाच सोडला आहे. (पृ.१७६). अर्थात प्रस्तुत ग्रंथ हा एका व्यापक योजनेतील अंशावतार असल्याने या संबंधात आताच अधिक काही बोलणे अकालघाईचे ठरण्याचा संभव आहे.

लेखकाचा तात्त्विक दृष्टिकोण म्हणजे जसा त्याचा वैयक्तिक अभिनिवेश नव्हे, तशीच ती वेळीअवेळी ओसंडणारी आत्यंतिक आत्मव्यक्तिपरताही नव्हे. देशपांड्यांच्या ग्रंथात अशी आत्मव्यक्तिपरताही अनेक जागी दिसते. अनेक ठिकाणी इतिहासलेखनाची मर्यादा ओलांडून येणारे देशपांड्यांचे प्रकट आत्मचिंतन किंवा भाष्य (उदा. पृ. २९, १८०, ३४१, ३८३-८४,) नाटकीपणाला स्पर्श करणारी कधी हळवी भावनावशता तर कधी जळजळती तीव्रता, 'प्रस्तुत लेखकाचे जीव तोडून मागणे आहे' ( पृ. ३३६ ) किंवा 'अहो' 'ऐका' अशा तऱ्हेची आवाहनपरता, अनावर आत्मप्रकटीकरण ह्या सर्व त्या आत्मव्यक्तिपरतेच्याच खुणा आहेत. अनेक ठिकाणी अनावश्यक किंवा विस्तृत उतारेही येतात ( पृ. १३६ - ३८, ३२४ - २७, ३३१ - ३२ ३९५ - ९७, ४१२ - १३, इ० )

'स्त्रियांच्या आयुष्यरूपी आकाशातील स्वातंत्र्यरूपी सूर्यास पारतंत्र्याचे खग्रास ग्रहण लागलेले' ( पृ. १८० ) 'भारतीय राष्ट्रचंद्राला मुसलमानी आक्रमणाच्या राहूने ग्रासावयाला सुरुवात केली होती' ( पृ. ७३ ) अशासारखी वारंवार येणारी आलंकारिक शैलीतील वाक्ये अशा ग्रंथात विसंवादी वाटतात; आणि तीही आधुनिक मराठी वाङ्मयाचे दोन भाग लिहिल्यानंतर यावीत याचे आश्चर्य वाटते.

आपण ( 'आमण' हवे ) आर्य ( आर्ष ) ओळी ( ओवी ) अशांसारखे अर्थघातक मुद्रणदोष तरी अशा ग्रंथात असू नयेत ही अपेक्षा. प्रा. रा. श्री. जोगांच्या "मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन" या पुस्तकाचा "मराठी वाङ्मयाभिरुचीचे सिंहावलोकन" असा सर्रास उल्लेख झाला आहे.

ग्रंथामधील आणखी एक विसंगती मुद्दाम निर्दिष्ट करण्यासारखी आहे. मात्र त्याचा संबंध लेखकाशी नसून प्रचलित शासकीय निर्णयापुढे लेखकालाही कसे हतबल व्हावे लागते याची ती निशाणी आहे. गेली सातआठशे वर्षे मराठीच्या शरीरावर शोभणारी अनुस्वारांची आभूषणे आज सरसकट निष्ठुरपणाने काढून फेकून दिल्याने आजची मराठी मनात रुसलेली तर नाही ना? अजूनही या अलंकारांची जोपासना करणाऱ्यांना मानवंदना आणि त्यांची कदर न करणाऱ्यांची निर्भर्त्सना करण्याकरिता ती मनातल्या मनात काही पुटपुटत नाही ना? असे प्रश्न लेखकाने केले आहेत ( पृ. २२२ ); आणि तरीही प्रस्तुत ग्रंथात त्याला हीच गोष्ट पत्करावी लागली आहे !

याप्रमाणे या ग्रंथात काही उणिवा, अपुरेपणा असला तरी या ग्रंथाची महनीयता निर्विवाद आहे. एका व्यक्तीने हाती घेतलेला हा महदुद्योग आहे. अजून बरीच मजल मारावयाची आहे. पुढच्या खंडात ह्या उणिवा, अपुरेपणा राहू नये एवढ्यासाठीच या सूचना नमूद करून ठेवल्या. पुढील भाग अधिक परिपूर्ण व्हावेत; अभ्यासक त्यांची उत्सुकतेने वाट बघत आहेत. मराठी साहित्यातील एक मोठी उणीव या वाङ्मयेतिहासाने भरून निघावयाची आहे.

हा वाङ्मयेतिहास वाचीत असताना मनात आलेला एक विचार तेवढा शेवटी नोंदवायचा आहे. वाङ्मयेतिहास-लेखनाचे प्रयोजन काय? तो वाचावयाचा कशासाठी? त्याचे वाचक कोण मानावयाचे? तो वाचीत असताना वाङ्मयानंदाची अपेक्षा करावयाची की नाही? यातून नवे वाचल्याचा, किंवा नवे अनुभवल्याचा आनंद मिळत नाही. ती नवी निर्मिती नसते; किंवा ह्यातून वैचारिक समाधानही मिळते असे नाही.—निदान मराठीतील तरी बहुतेक वाङ्मयेतिहासांबद्दल हे खरे आहे. इतर वाङ्मयाप्रमाणे वाङ्मये-तिहासाचेही सामान्य वाचक, जिज्ञासू वाचक, जाणता वाचक असे अनेक थर असणे शक्य आहे. त्यांच्यासाठी विविध दृष्टींतून असे इतिहास लिहिणे शक्य आहे, आवश्यक आहे. इतिहासग्रंथ हा शास्त्रीयतेकडे झुकणारा ग्रंथ. असे ग्रंथ सलग, एका बैठकीत वाचण्यासाठी नसतात. नित्याचा संदर्भग्रंथ म्हणून त्यांचे महत्त्व असते. परंतु त्यातही उत्तमोत्तम कृतींचा परिचय करून देणारा भाग, त्यातील वेचक उतारे यांतून वाङ्मयानंद होऊ शकतो. मात्र त्यासाठी विनाकारण कृत्रिम लालित्य आणण्याचा खटाटोप करण्याची आवश्यकता नाही.

वाङ्मयेतिहासात जे चैतन्य येते ते लेखकाच्या दृष्टि-कोणामुळे. श्रेष्ठ लेखकाच्या वाङ्मयेतिहासातून त्याच्या वाङ्मयीन दृष्टीचा, त्याच्या प्रगल्भ व्यक्तिमत्त्वाचा प्रत्यय येऊ शकतो. त्याच्या दृष्टीतून समग्र वाङ्मयनिर्मितीचे दर्शन—आकलन होते. असा वाङ्मयेतिहास वाङ्मयाकडे बघण्याची दृष्टी देऊ शकतो. वाङ्मयेतिहास ही जशी घटनांची, वाङ्मयकृतींची आणि कर्त्यांची नोंद असते, तसेच ते भाष्यही असते. त्यात टीकात्मक गुण अवश्य असू शकतात. टीकावाङ्मयाला जे मोल आहे ते अशा वाङ्मयेतिहासालाही आहे. मात्र अशा वाङ्मयेतिहासात लेखकाचा वैयक्तिक अभिनिवेश, त्याच्या दृष्टीचा पूर्वग्रह-दूषितता किंवा असंयत आत्मप्रकटीकरण नसले पाहिजे.

सु. रा. चुनेकर

• • •

### दौत्रिन क्रिस्तां–

महाराष्ट्रातील संशोधनक्षेत्रात गोव्यामधील पोर्तुगीज मिश-नऱ्यांसंबंधीच्या कार्यामुळे प्रा. प्रियोळकर यांना एक विशिष्ट स्थान लाभले आहे. गोव्यातील पोर्तुगीज धर्मकारणाचा प्रा. प्रियोळकरांनी घेतलेला परामर्श फार मोलाचा आहे. क्रिस्ती धार्मिक मराठी वाङ्मयाच्या व्यासंगाबद्दल उच्च-पदस्थ मिशनऱ्यांनीसुद्धा त्यांचा गौरव केलेला असून मराठी भाषा आणि मुंबईच्या सामाजिक चळवळी व त्यांचे पुढारी यांचेविषयी बरीच माहिती उपलब्ध करून दिल्या-बद्दल जिज्ञासू अभ्यासक त्यांचे ऋण मानतो. आपल्या संशोधनकार्यात प्रा. प्रियोळकरांनी मुख्यतः संपादकाची भूमिका पत्करलेली दिसते. नित्य जागरूक अशा सूक्ष्म दृष्टीने संकलित केलेल्या माहितीचे बारकावे नीट तपासून आपल्या प्रतिपाद्य विषयाला योग्य वाटेल त्या पद्धतीने शक्य तेवढ्या जास्त माहितीची मांडणी ते अशा रीतीने करतात की सांगावयाचा मुद्दा आपोआप स्पष्ट व्हावा. आपल्याला लागणारा निराळा अर्थ लादून विवेचनाच्या वस्तुनिष्ठतेत विक्षेप येऊ द्यावयाचा नाही. हे त्यांचे वैशिष्ट्य बहुधा सर्वमान्य आहे. म्हणून भारतातील जगन्मान्य ज्येष्ठ भाषाशास्त्रज्ञ डॉ. सुनीतिकुमार चतर्जी यांनी दौत्रिन क्रिस्तांच्या या आवृत्तीबद्दल संतोष व्यक्त करताना गौरवून म्हटले आहे की, "I am very happy with the generally excellent quality of this edition quite in keeping with Professor Priyolkar's reputation. This book will be of very great value, not only in the intensive study of Marathi and Konkani, but also in the comparative study of the New Indo-Aryan speeches." ही आवृत्ती सखोल अभ्यासाला अतिशय महत्त्वाची असल्यामुळे जरा सूक्ष्म दृष्टीने पाहणे अगत्याचे ठरते.

संपादक अ. का. प्रियोळकर, पुणे विद्यापीठ ग्रंथ-माला क्रमांक ५, पुणे विद्यापीठ पुणे, १९६५, पृ. २४ + ७६ + ४४.

अनुक्रमणिका

दौत्रिनीच्या या प्रवचनात फादर स्टीफन्सने वापरलेली भाषा म्हणजे सतराव्या शतकाच्या सुरुवातीला गोव्यातील ज्या सासष्टी भागात तो कार्य करीत होता तेथील बोली. कोंकणी वाङ्मयाचा हा सर्वांत जुना नमुना असल्यामुळे भाषाभ्यासाला तो फार महत्त्वाचा आहे. गोव्यात मोठ्या प्रमाणावर झालेल्या धर्मांतराचा परिणाम भाषेवर अपरिहार्यपणे झाला. परंतु भाषेच्या अभ्यासाला तत्कालीन धर्मांतराच्या समस्येचा अधिक विचार करण्याची फारशी गरज नाही. त्याप्रमाणे "हे पुस्तक प्रसिद्ध करण्याचा हेतू धार्मिक नाही, तर केवळ भाषिक आहे" असे प्रस्तावनेत स्पष्ट केले आहे. वस्तुतः प्रस्तुत आवृत्ती काढण्याचा मुख्य उद्देश याहीपेक्षा मर्यादित म्हणजे रोमन लिपींत लिहिलेल्या कोंकणी भाषेचे देवनागरीमध्ये लिप्यंतर करावयाचे एवढाच आहे. त्यामुळे भाषेच्या इतर अंगांकडे न पाहता लिप्यंतरापुरताच विचार करणें येथे इष्ट ठरेल.

या आवृत्तीत इ० स० १६२२ साली छापलेल्या मूळच्या Dovtrina Christam em Lingoa Bramana Canarim चे मुखपृष्ठ, परमपवित्र प्रभूप्रसाद व 'जेजूस' या ग्रीक शब्दाचा संक्षेप या तीन पृष्ठांचीं छायाचित्रे दिली असून पहिल्या आवृत्तीच्या मुद्रणाच्या ३ छोट्या परवान्याचे भाषांतर सादर केले आहे. खरे म्हणजे मूळ परवान्यांची छायाचित्रेदेखील अधिक श्रेयस्कर झाली असती. मूळ आवृत्तीमधील कोणताही भाग सोडावयाचा नाही म्हणून देवनागरी दौत्रिन संपल्यावर Method of Serving Mass हे फा० लोबो यांनी लॅटिनवरून केलेले इंग्रजी भाषांतर दिले आहे. इंग्रजीऐवजी मराठी भाषांतर या ठिकाणी शोभून दिसले असते.

प्रस्तावनेत क्रिस्ती धार्मिक-प्रश्नोत्तरी साहित्याचा थोडक्यात इतिहास, फा. स्टीफन्सचे वाङ्मयीन कार्य, सेंट झेवियरची प्रचारपद्धती यांविषयी माहिती आहे. कुंभारजुवेंचा बारांव तोमास मौराव (इ. स. १८४२-१९०४) याने या दौत्रिनीचे पहिल्या आवृत्तीवरून देवनागरी लिप्यंतर केले होते पण ते प्रकाशात येऊ शकले नाही. कालांतराने ते हस्तलिखित गहाळ झाले. प्रा. प्रियोळकरांचे लिप्यंतर डॉ. मारियानू सालदाञ यांनी संपादिलेल्या रोमन आवृत्तीवरून केलेले आहे. प्रस्तुत लिप्यंतराच्या एका फॉर्मची प्रुफे पाहून डॉ. सालदाञांनी काही सूचना केल्या तेव्हा उच्चारानुसारी लिप्यंतराबद्दल प्रा. प्रियोळकरांनी दर्शविलेला मतभेद रास्त आहे. लेखी रोमन संहितेबरहुकूम लिप्यंतर करण्याचा उपक्रमच योग्य होय.

देवनागरी संहितेपूर्वी प्रत्येक देवनागरी अक्षराच्या जागी आदर्शभूत रोमन आवृत्तीत कोणते रोमन अक्षर येते ते सोदाहरण दाखविणारे दोन पानी कोष्टक दिलेले असल्याने लिप्यंतर पडताळून पाहण्याची सोय झाली आहे. संहितेच्या पहिल्या काही पानांवरून नजर फिरविली तर या कोष्टकातल्या काही उणिवा चटकन लक्षात येतात. आणि जरा बारकाईने पाहिले तर काही विसंवाद दिसू लागतात. नजरेत भरणारी पहिली बाब म्हणजे वारंवार येत राहणाऱ्या अर्धचंद्राने दर्शविलेल्या 'ॲ' व 'ऑ' या स्वरांचा किंवा स्वरचिन्हांचा अभाव. तसेच पहिल्या तीन पानांत जेज्, जेजूचे, जेजूमु, खूण वगैरे अनुस्वाररहित दीर्घ ऊ असलेली रूपे आहेत तरी कोष्टकात ऊ चा प्रतिवर्ण दिसत नाही. एवढेच नव्हे तर तारांकित तळटीपेत "दीर्घ ऊ दाखविण्याची सोय या लेखनपद्धतीत नाही" असे आवर्जून स्पष्ट केले आहे. पुढच्या पानावर "i व u यांवर ~ हें अनुस्वारदर्शक चिन्ह दिलें असता त्यांना दीर्घत्व येतें. ũ चा उच्चार ऊं किंवा वुं असाही होतो" असा एक विशेष सांगितला आहे. परंतु शेवटची शब्दसूची चाळली तर "खडं, जालेडं, सर्वांइं सांगातिं, होस्तिंतु, चालुंच्याक, मेळुंच्याक, येउं, होउं, हुंगुचे" अशी अनेक सानुस्वार ऱ्हस्व इ व उ ची संहितेत येणारी रूपे आढळतात. इतकेच नव्हे तर 'गर्भि-गर्भी; देउं-देऊं' सारखी विकल्प दाखविणारीही काही उदाहरणे सापडतात.

c आणि g यांचे भिन्न उच्चार केव्हा होतात ते सांगितले पण e च्या ए व य या फरकाबाबतची नोंद राहून गेली आहे. तक्त्याप्रमाणे इ, औ, क्, ग्, य्, व्, आणि स् यांपैकी प्रत्येक वर्ण दोन वेगळ्या रोमन अक्षरांनीं दाखविता येतो. वस्तुतः देवनागरी ज् च्या जागी j, z, i, व s ही चार रोमन अक्षरे येऊ शकतात तरी तक्त्यात ज् = z हे एकच अक्षर आढळते. (पाहा-जरि-jarij zari व IESVS) जेजूस् तसेच पास्क-Paschoa, क्रिस्तां-Christam मध्यें क् = ch आणि लिंग्व-lingoa, क्रिस्तावं Christaô मध्ये व् = O असता अपेक्षित ठिकाणी तक्त्यात यांचा समावेश नाही. नॉव्हिसिमुश्-Novissimos (पृ. ४५) मधील o = ऑ आणि उ, v = व्ह, अंत्य s = श् यांचीही नोंद नाही. फा. स्टीफन्सच्या लेखनात व्ह=uh येतो.

काही शब्दांचा विचार करताना कूट प्रश्न उभे राहतात. उदाहरणार्थ Seo= सेउ आणि Seio= सेयु

असेल तर o = उ, io = यु म्हणजे i = य्; परंतु Pontio चे लेखन पांसियु केले तर फक्त o = यु असे होईल. या शब्दाबद्दल एक शंका उपस्थित होते. ती अशी की त्याचा पोर्तुगीजमधील उच्चार सोडून लॅटिन उच्चार का पत्करला आहे? इतर सर्वत्र पोर्तुगीज उच्चारांचा प्रभाव स्पष्ट आहे. का t=स् समजावयाचा? (पृ ६४, १९) शिवाय Paschoa–पास्क येथे oa = अ, lingoa–लिंग्व मध्ये oa = व इत्यादी उदाहरणांवरून असे दिसेल की रोमन o चे लिप्यंतर करणे मोठे अडचणीचे आहे. सर्वत्र केवळ लेखनावर किंवा नुसत्या लिपीवर विसंबून भागत नाही. लेखनामध्ये उच्चारप्रक्रिया सर्वस्वी टाळता येणे अशक्य होते. म्हणून अशा ठिकाणी उच्चारणामुळे येणाऱ्या अडचणी आणि त्यातून काढलेला मार्ग यांची आवश्यक तेवढी नोंद प्रस्तावनेत दिली असती तर बरे झाले असते.

रोमन 'o' देवनागरी लिप्यंतराच्या दृष्टीने समस्या निर्माण करणारा आहे. पण देवनागरीत ॲ व ऑ उच्चार दाखविणारी रोमन अक्षरे कोणती ते खालील काही जोड्यांवरून समजण्यास अडचण पडू नये.

ॲ – ऑ : कॉफॅसार (पृ. ४-१६), आवॅ ऑरासांव (११-२३)

ॲ – ए : फॅ (१·२०) – गे (१५·३), साल्वॅ रेजिना (१६-११)

ॲ – आ : क्रॅदा (१८·२)

ऑ – आ : मात्रिमॉनियु (४२·२१), कॉंसाग्रार (३७·२४)--क्रॅदॉ (५·१७)

ऑ – ओ : ऑर्दे (४२·२०) ओरिज़िनाल (४३·५) इत्यादी.

म्हणतावूं, क्रिस्तावूं अशासारख्या काही ठिकाणी अंत्य वूं ~ ऊं हा विकल्प मान्य केलेला दिसतो. ज्या रोमन आवृत्तीवरून हे लिप्यंतर झाले त्यामधील एकदोन पृष्ठांची छायाचित्रे येथे दिली असती तर काही शंकांचे निरसन करून घेणे सोपे झाले असते डॉ. प्रभुदेसाईंच्या 'सतराव्या शतकातील गोमंतकी बोली' या ग्रंथामध्ये स्टीफ़न्सच्या दौत्रिन क्रिस्तांच्या पहिल्या आवृत्तीमधील एका पृष्ठाचे छायाचित्र (plate no. 1) आहे. त्यामध्ये प्रस्तुत देवनागरी आवृत्तीतील पृ. १ ओळ १९ पासून पृ. २ ओ. ५ पर्यंतचा मजकूर पाहावयास मिळतो. त्यात क्रिस्तावं शब्द तीनदा आला आहे. त्यावरून o = वं (ओळी १०) आणि ū = ऊं (ओ. १०, १९) आहे असे दिसते. fee = faith चे लिप्यंतर फॅ आहे म्हणजे ॲ = ee. छायाचित्राप्रमाणे देवनागरीतील मुर्ती (१·२१), स्कॉचो (२·१) ही रूपे ऱ्हस्व आहेत. पावलोइ व्हडित्र या शब्दातील व = ua प्रमाणे (सत्यमानुची शब्द दोनदा येतो त्यात) य = ea नसून फक्त e दिसतो. डॉ. सालदान्ह यांनी संपादिलेल्या आवृत्तीमध्ये फा. स्टीफन्सच्या मूळ पाठात फेरबदल केलेले असणार परंतु ते रोमन लेखनामध्ये एकसूत्रीपणा आणण्यासाठी असावेत. ऱ्हस्वदीर्घासारखे उच्चारानुसारी बदल त्यांनी केलेले असतील तर ते वाजवी नव्हे.

"त्या काळीं लोक उच्चार कसे करीत हे आज कळणें कठीण आहे" असे प्रस्तावनेत म्हटले असले तरी प्रा. प्रियोळकरांनी टीपांमध्ये 'आमें' ऐवजी 'आमँ' किंवा विर्जें याचा उच्चार 'विर्इजँ' करावा अशा सूचना दिल्या आहेत. स्टीफन्सच्या लेखनात असलेला अ ~ आ चा गोंधळ सोदाहरण दाखवूनही 'सास्राइ' या एका शब्दाबाबत मात्र तो मुद्राराक्षस बनला आहे. खरे म्हणजे टीपांच्या छपाईमध्येच फार मुद्राराक्षस राहून गेले आहेत. प्रणाम (परिणामा)च्या जागी पडलेल्या प्रमाण (पृ. ७२) सारखे काही ठळक दोष तरी शुद्धिपत्रात सुधारणे जरूर होते. टीपांमधील अनेक शब्दांची रूपे संहिता आणि सूची यांमधील त्यांच्या रूपांहून भिन्न अशी आढळतात. उदा. कॉफिसावं (पृ. १) कॉंफेसांव (टी. पृ. ७३); आराटि (पृ. १) आराटी (पृ. ७०).

पहिल्या दोन पानांवरील जेजू (१. १७, २९) जेजूस् ही रूपे सूचीमध्ये ऱ्हस्व आहेत. 'कामाधामाक'मधील 'धामाक' हे अभ्यस्त रूप सूचीत स्वतंत्र नोंदलेले दिसते. तारांकनाचा अर्थ दिला नसला तरी सूचीमधील तारांकित शब्द प्रचारातून गेलेले असावेत. असे असेल तर "पळेऊंचे" हे रूप तारांकित पाहिजे होते. पहिल्या पृष्ठावरील १०, ११, १२ ओळींच्या सुरुवातीची अधिक चिन्हे कशासाठी आहेत त्याचा बोध होत नाही.

कोणी सुचविलेल्या दुरुस्त्या पटल्या तर पुढील आवृत्तीत त्यांचा स्वीकार होईल असे आश्वासन प्रस्तावनेत असल्यामुळे जरा बारकाईने पाहून हा अभिप्राय सादर केला आहे कोकणीतील सर्वांत जुना ग्रंथ शक्यतो निर्दोष होण्यासाठी

या बाबींचा पुढील आवृत्तीच्या वेळी उपयोग होईल अशी आशा आहे.

भाषादृष्ट्या महत्त्वाचा हा ग्रंथ मराठीच्या अभ्यास-काला उपलब्ध करून दिल्याबद्दल प्रा. प्रियोळकरांना धन्यवाद.

मु. ग. पानसे,

●●●

## कोलाम

सामान्य मराठी सुशिक्षितांचे स्वदेशाबद्दलचे अज्ञान लक्षात घेता, प्रथमच हे सांगितलेले बरे की 'कोलाम' ही मांडवकरांची चमत्कारिक नावाची नवी कादंबरी नव्हे तर महाराष्ट्र आणि आंध्र ह्यांच्या सीमाप्रदेशात राहणाऱ्या एका द्राविडभाषी आदिवासी जमातीचे हे सर्वांगदृष्ट्या केलेले कादंबरीइतकेच रोचक वर्णन आहे! (सुशिक्षितांच्या ज्ञाना-बद्दलचा उल्लेख सकारण आहे. थोड्याच महिन्यांपूर्वी कोकणी ही मराठीची बोली नव्हे असे एका मराठीच्या प्राध्यापकांना आवर्जून सांगण्याचा प्रसंग माझ्यावर आला. स्वदेशापेक्षा युरोप, अमेरिका ह्यांच्याबद्दलचे ज्ञान पुष्कळदा जास्त समाधानकारक असते. ही परिस्थिती दूर व्हायची असेल तर 'कोलाम' सारखी कितीतरी पुस्तके मराठीत प्रकाशित व्हायला हवीत.)

समाज, संस्कृती, भाषा, आणि लोकश्रुती (folklore) ह्यांच्या अभ्यासाच्या क्षेत्रात दोन परंपरा आढळतात. एक हौशी जिज्ञासूंची आणि दुसरी वैज्ञानिक प्रशिक्षण मिळालेल्या अभ्यासूंची. अर्थात हा भेद पंक्तिभेदाइतका ताणण्यात औचित्य नाही. एक तर काही हौशी जिज्ञासू रेखीव, पद्धतशीर, आणि कधी कधी मर्म वेधणारी वर्णने लिहून गेले आहेत, उलट काही वैज्ञानिकांनी 'प्रौढत्वीं निज शैशवास' जपून आपल्या वर्णनात हौस आणि जिज्ञासा ह्यांपोटी येणारा ताजेपणा आणि प्रत्ययकारिता हे गुण टिकवून धरण्यात यश मिळवले आहे! दुसरे असे की आताच सूचित केल्याप्रमाणे एखाद्या समाजात वैज्ञानिक अभ्यास मूळ धरतो तो आधी हौशी जिज्ञासा आणि मग प्रशिक्षण, पद्धतशीर संशोधन ह्याच नैसर्गिक क्रमाने. निरनिराळ्या ज्ञानशाखांचा इतिहास पाहिल्यास हौशी जिज्ञासूंनीच त्या त्या ज्ञानशाखांचे शैशव घडवले असे दिसून येईल.

ह्या दोन परंपरांपैकी पहिल्या परंपरेत प्रस्तुत ग्रंथाचे स्थान आहे आणि ते मानाचे स्थान आहे. केवळ अनुदाने देऊन संशोधन फोफावत नसते. त्याला आतून प्रेरणा व्हावी लागते आणि तिची जोपासना करावी लागते. ह्या प्रेरणेच्या बाबतीत महाराष्ट्रात आतापर्यंत झालेला विचार थोडा एकांगी आहे असे मला वाटते. पोटतिडीक, निःस्पृहपणा, तर्ककठोरता इत्यादी उग्र प्रकृतीच्या गुणांची चहा व्हावी हे ठीकच आहे. तसेच संशोधनाचा उपयोग व्हावा ही अपेक्षाही रास्त आहे. पण ह्याचबरोबर संशोधन हा मूलतः एक आनंददायी व्यापार आहे, संशोधकाचे नाते जसे संन्यासी, व्रती लोकांशी आहे तसेच (किंबहुना त्याहूनही जवळचे) कलावंतांशी आहे. निरागस कुतूहलाने मुंग्यांच्या रांगेकडे पाहणाऱ्या बालकाशी आहे ह्याचा विसर आपल्याला पडला आहे. हा ग्रंथ पुष्कळांनी वाचला आणि ह्या विसरलेल्या सत्याचा प्रत्यय त्यातल्या काही थोड्या वाचकांना जरी आला तरी मांडवकरांच्या परिश्रमांचे सार्थक झाले असे मी म्हणेन. (अगदी अनुक्रमणिकेपासून ग्रंथभर लेखकाने उद्गार-चिन्हांचा नुसता सडा घातला आहे, तोही मी त्याला ह्याच कारणाखातर माफ केला आहे!)

संख्या आणि स्थान, वस्ती, घर व व्यक्ती, जन्म आणि जीवनाची घडण, विवाह, धर्म, देवदेवता आणि सणवार, कला, न्याय, नीती आणि गुन्हेगारी; आर्थिक जीवन, वयोमान, रोगराई व मृत्यू, वेगळ्या वाटा (नव्या समाजरचनेचा आणि शिक्षणाचा परिणाम), भाषा अशा अकरा प्रकरणांतून लेखकाने कोलामांचे जीवन गर्भवासा-पासून मृत्यूपर्यंत, उदरभरणापासून कोलामी हिंदुधर्माच्या स्वरूपापर्यंत चित्रित केले आहे. भाषेच्या प्रकरणातच काही गाणी, सुटी वाक्ये, आणि सुमारे ३००० शब्द ह्यांचा संग्रह केला आहे. (शिवाय काही गाणी, शब्द ही इतरत्रही आली आहेत.) तळटीपातून निश्चित संदर्भ, नकाशे, लोकसंख्येची कोष्टके, छायाचित्रे इत्यादी उपयुक्त सामग्रीही पुरवली गेली आहे. (एकत्रित संदर्भसूची, म्हणींचा संग्रह, गाण्यांच्या बरोबरच लोककथांचे नमुने, छायाचित्रांबरोबरच रेखाचित्रे ह्यांची उणीव जाणवते.) सुरुवातीला संशोधनाच्या मर्यादा आणि पूर्वीच्या

लेखक : श्री. भाऊ मांडवकर. अमरावती : सेवाप्रकाशन, १९६६. पृ. ४२८ + नकाशाचे पान. छायाचित्रे, नकाशे, आकृत्या, नाम-सूची ह्यांसह, मूल्य २० रु. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने अनुदान दिलेला ग्रंथ.

संशोधकांचे कार्य ह्यांबद्दल अपेक्षित निवेदन आले आहे. (उदाहरणार्थ, ग्रंथ एकंदर जमातीबद्दल असला तरी यवतमाळ जिल्ह्यातील कोलामांचेच निरीक्षण अधिक बारकाव्याने केले आहे ह्याची कबुली लेखकाने दिली आहे.) माहिती कसकशी मिळवली ह्याबद्दल थोडया आणखी तपशिलाने वर्णन दिले असते तर दिलेल्या माहितीच्या विश्वसनीयतेविषयी आडाखे बांधणे वाचकाला जरा सोपे गेले असते. (उदा० लोकसंख्येच्या आकड्यांपैकी सरकारी शिरगणतीमधून घेतलेले कोणते आणि लेखकाने स्वतः पाहणी करून ठरवलेले कोणते हे काही ठिकाणी पुरेसे स्पष्ट झालेले नाही. कोलामांच्या लैंगिक जीवनाबद्दल मोकळेपणाने वर्णन केले आहे हे स्वागतार्ह आहे, पण अशी माहिती कुठून मिळवली ह्याबद्दल निर्देश नाही.) सामान्य वाचकाला चटकदार आणि colourful वाटेल अशाच माहितीवर भर द्यायचा अशी एक अनिष्ट प्रवृत्ती अशा स्वरूपाच्या मराठी ग्रंथांतून कधीकधी दिसते ती येथे दिसत नाही हे विशेष. जंत्र्या, आकडेवारी, कोलाम सुतारकी करतात का अशा वरवर रूक्ष वाटणाऱ्या माहितीचेही महत्त्व असते ह्याचे लेखकाला भान आहे. मात्र त्या रुक्षतेचेच त्याने भांडवल केलेले नाही. ह्याच्या जोडीचाच लेखकाचा दुसरा गुण म्हणजे आदिवासी लोकांबद्दल एक नसता भावुकपणा आपल्याकडे असतो त्यापासून तो मुक्त आहे. कोलामांच्याबद्दल त्याला एक आत्मीयता जरूर आहे, पण त्यांच्यामध्ये रोगराई, गुन्हेगारी, व्यसनाधीनता सापडते आणि चित्रकला सापडत नाही हे नमूद करायला तो कसूरत नाही; आणि ग म भ न, ग्रामविकास, ख्रिस्ती मिशनरी, सायकली इत्यादी गोष्टींचाही त्यांच्या जीवनाला स्पर्श होतो ह्याची त्याला जाणीव आहे.

कोलामाच्या संस्कृतीवर आणि समाजरचनेवर जी प्रकरणे आहेत त्यांमधून संस्कृतिवैज्ञानिकाला आणि समाजवैज्ञानिकाला पुष्कळच विचाराला खाद्य मिळण्यासारखे आहे. (physical anthropology आणि cultural anthropology ह्यांना मानवप्राणिविज्ञान आणि संस्कृतिविज्ञान हे शब्द अनुक्रमे वापरावेत असे मी सुचवतो. त्या दोहोंची मोट बांधून तिला मानववंशशास्त्र वा नृतत्त्व ह्यांसारखे काही नाव देण्यात विशेष स्वारस्य नाही असे मला वाटते. समाजविज्ञान हा शब्द अर्थात sociology साठी वापरला आहे.) उदाहरणार्थ पृ. १२१-२ वर आलेले 'कासइपा' (मराठी नाव 'काष्टाफेडी') ह्या चालीचे वर्णन पाहावे.

"कोलामामध्ये मुंजीसारखा एक विनोदी पण अर्थपूर्ण प्रकार आहे. साधारणतः मूल तीनचार वर्षांचे झाले की, त्याची ही 'मुंज' (!) उरकण्यात येते. हा कार्यक्रम नागपंचमीच्या दिवशी करण्यात येतो. ... घरातील म्हातारा आजोबा व तो... मुलगा यांचे गमतीचे लग्न लावावयाचे असते. ... आधल्या दिवशी ... 'काकणं' (लग्नात हातास बांधावयाच्या पिवळ्या पट्ट्या) बांधली जातात. ... म्हातारा 'नवरदेव' होतो. ... मुलास ... छोटे धोतर नेसवितात व ... चोळीही घालतात. ... मुलाचा कासोटा पुन्हा पुन्हा सोडण्याचा प्रयत्न करण्यात येतो. ... तो मुलगा त्या घडीपासून जातिसमाजाच्या पंचायतीला हजर राहू शकतो ... इत्यर्थ ... तो मुलगा 'सज्ञान' होतो ..."

ह्या ठिकाणी अधिक शोध घेणे जरूर आहे हे उघड आहे. केवळ गंमत, मुलाला धोतर नेसण्याचे शिक्षण ह्यापलीकडे नक्कीच काही अर्थ ह्यातून निघत असावा. त्याचप्रमाणे कोलामांच्या समाजरचनेत तिचे मूळ tribal स्वरूप आणि हिंदुजातिसंस्थेत तिचे विलीनीकरण हा दोहोंचा जो संघर्ष कुठे कुठे दिसतो त्याचाही अधिक खोलवर अभ्यास होणे जरूर आहे.

'भाषा' ह्या प्रकरणाचे लक्ष्य मर्यादित आहे. कोलाम जीवनाचे एक अंग म्हणून भाषेबद्दल त्रोटक माहिती दिली आहे. वर्णविन्यास आणि व्याकरणाचा प्रपंच केलेला नाही. बहुतेक प्रकरण गाणी, वाक्ये, शब्द ह्यांच्या संग्रहांनीच व्यापलेले आहे. कोलामी भाषेवर पूर्वी सेतुमाधवराव पगडी, बरो (Burrow, ब्यूरो नव्हे), एमनो (Emeneau एमेन्यू, एम्यानो नव्हे) इत्यादींनी काम केले आहे. त्याचा उपयोग करून घेण्याबरोबर स्वतंत्र निरीक्षणही लेखकाने केले आहे. यवतमाळ जिल्ह्यातील कोलामीचा पूर्वी अभ्यास झाला नसल्यामुळे ह्या निरीक्षणाचे महत्त्व विशेष आहे.

हौशी जिज्ञासूंचे भाषेच्या अभ्यासातील मर्मस्थान म्हणजे वर्णविन्यास. येथे मांडवकर कमी पडतात. एमनोने वर्ध्याच्या कोलामीची वर्णावली पुढीलप्रमाणे दिली आहे.

अ आ इ ई उ ऊ ए॒ ए ओ॒ ओ

क् ग् ङ् च् ज् ट् ड् त् द न् प् ब् म्

य् र् ल् व्

स् ज़्

यवतमाळच्या कोलामीची वर्णावली स्वतंत्रपणे दिलेली नाही, पण ती मांडवकरांच्या मते पुढीलप्रमाणे असावी असे दिसते.

अ आ इ ई उ ऊ ए ऐ ओ औ (पृ. ३३२ वर ऋ सुद्धा)

क् ख् ग् घ् ङ् च् छ् ज् झ् ट् ठ् ड् ढ् त् थ् द्
ध् न् प् फ् ब् भ् म्
य् र् ळ व्
श् स् ह्

एमनो आणि मांडवकर ह्यांच्या याद्यांमध्ये जे फरक आहेत ते मला बरेचसे संशयास्पद वाटतात.* कोलामी-सारख्या द्राविड भाषेत ह्रस्व आणि दीर्घ ए, ओ हे भेद नसावेत हे चमत्कारिक दिसते. उलटपक्षी, ख् घ् इत्यादी महाप्राण व्यंजनांची भरतीही आश्चर्यकारक आहे. मराठीतून आलेल्या शब्दांत महाप्राण कधी कधी दिसतात, मात्र ते शब्द कोलामीत पूर्णपणे सामावून गेले म्हणजे त्यांतील महाप्राणांचे अल्पप्राण होतात, क्वचित द्राविड शब्दातही ते विकल्पाने आढळतात--अशी एमनो ह्यांनी नोंद केली आहे. मांडवकरांनी ह्या सर्व पर्यायांची नीट नोंद घेतली आहे की नाही ह्याबद्दल शंका वाटते. भारतीय भाषांमधील वर्णांची नोंद रोमन लिपीत करताना एमनोंना अडचण पडली असणार ही मांडवकरांना वाटलेली भीती अज्ञान-मूलक आहे.

तीच परिस्थिती एमनोंच्या क्रियापदांच्या दुहेरी नोंदीवर त्यांनी केलेल्या टीकेची आहे. आडाग् (चालणे), आडाप् (खेळवणे) ह्या रूपांबरोबरच एमनो ह्यांनी आडाग्त्--, आडाप्त्-- असे भूतकाळाचे stems दिले आहेत. परंतु तत्संबंधी एमनोंनी केलेला खुलासा लक्षात न घेता मांड-वकरांनी त्यांना दोष दिला आहे; हे "कोलामीचे इंग्रजी-करण आहे... 't' लावून केलेले घसरते उच्चार वस्तुतः कोलामीत नाहीत" (पृ. ३१४), असे ते म्हणतात. वास्तविक ह्या त् जोडलेल्या रूपांची मांडवकरांनीच वाटेल तेवढी उदाहरणे पृ. ३२९-३६ वर दिली आहेत: काटतान् - बांधला, ओलतान्-- पाहिला, इ. इंग्लिश कोशात give क्रियापदापुढे gave, given ही रूपे यावीत किंवा मराठी कोशात दे- धातूपुढे दिल्- हे रूप नोंदावे त्यातलाच हा प्रकार आहे. तसे करून एमनो ह्यांनी कोलामीचे इंग्रजीकरण केले आहे असे म्हणणे हास्यास्पद आहे. आडाग्त्--, आडाप्त्--ह्यांना प्रत्यय जोडून भूतकाळाची रूपे बनतात एवढेच एमनो ह्यांना नोंदवायचे आहे.

कोलाम लोक आपल्या संस्कृतीमधील विशेष गोष्टींना मराठी नावे देतात हे लेखकाने जागजागी नमूद केले आहे--उदा० कासाइपा = काष्ठफेडी, साती = गावबांधणी, इत्यादी. अशा मराठी शब्दांची एक अकारानुक्रमे यादी दिली असती तर सोयीचे झाले असते.

लोकश्रुतीच्या अभ्यासाच्या दालनात मांडवकरांनी मुख्यतः काही गाण्यांचे संकलन एवढीच भर घातली आहे.

सारांश, समाजविज्ञान, संस्कृतिविज्ञान, भाषाविज्ञान, आणि लोकश्रुतिविज्ञान (folkloristics) ह्या चारही क्षेत्रांमधील अभ्यासकांना मांडवकरांनी कमीअधिक मोलाची सामग्री दिली आहे. इतरेजनांच्या स्वदेशा-बद्दलच्या कुतूहलबुद्धीला चोदना दिली आहे. ह्या दुहेरी कामगिरीबद्दल श्री. मांडवकर अभिनंदनास पात्र आहेत.

पुस्तकाचे मुद्रण, वेष्टन, आदी बाह्यांग सुबक आहे. नकाशे मात्र अधिक सुबक आणि सुवाच्य करता आले असते.

— अशोक रा. केळकर

• • •

## चंबळची दस्यूभूमी :--

स्वतंत्र भारतासमोर ज्या अनेक समस्या उभ्या राहिल्या. त्यांपैकी चंबळ खोऱ्यातील डाकूगिरी ही एक आहे. ही समस्या अद्याप समाधानकारक रीतीने सुटली नाही. अद्यापही राज्य सरकार आणि केंद्र सरकार यांची ती डोकेदुखी आहे. अशा या जटिल समस्येचे विवेचन करण्याचा प्रयत्न गीता साने या प्रथितयश लेखिकेने या पुस्तकात केला आहे. तिने या डाकूगिरीचा दोन वर्षे शोध घेतला. या शोधात

* प्रस्तुत समीक्षकाने कोलामी भाषेवर काही दिवस काम केलेले आहे. पण त्याची टिपणे पानशेत पुरात नष्ट झाल्यामुळे येथे याहून अधिक निश्चयाने विधान त्याला करता येत नाही.

लेखिका गीता साने, मौज प्रकाशन, मुंबई, पृ. १९६, मूल्य रु. १५.

तिने चंबळ खोऱ्यातील डाकूपीडित गावांना आणि कुटुंबांना भेटी दिल्या, प्रमुख कार्यकर्ते आणि सरकारी अधिकारी यांच्या गाठीभेटी घेऊन त्यांच्याकडून ही समस्या समजून घेण्याचा प्रयत्न केला, आचार्य विनोबा भावे यांच्याशीही चर्चा केली आणि या विषयाला आनुषंगिक असे अनेक ग्रंथ आणि सरकारी इतिवृत्ते यांचे परिशीलन केले. या सर्व परिश्रमाचे फळ म्हणजे हे पुस्तक होय. चंबळ खोऱ्याची परिस्थिती, त्या खोऱ्यात निर्माण झालेले डाकू आणि त्यांची संघटित डाकूगिरी यांची माहिती प्रथम देऊन लेखिकेने इतिहासाचा मागोवा घेतला आहे. तसेच अर्वाचीन डाकू आणि डाकूगिरी यांचा आढावा घेतला असून डाकूगिरीवरची उपाययोजना व त्याला आलेले यशापयश यांचीही चर्चा केली आहे. दोन वर्षांनंतर सन १९६३ मध्ये लेखिकेने पुन्हा चंबळ घाटीत परिभ्रमण करून या समस्येच्या ' खोलीचे तिसरे परिमाण ' अजमावण्याचा प्रयत्न केला आहे. शेवटी शोध संपला असला तरी जिज्ञासा संपूर्णतः तृप्त झाली नाही अशी कबुली लेखिकेने दिली आहे. आणि ' दोष माझ्या दोषैक वृत्तीचा नसून विषयाचा आहे ' असे सांगून लेखिका मोकळी झाली आहे.

या पुस्तकावरून चंबळ खोऱ्यातील डाकूगिरीची कल्पना वाचकांना चांगल्या रीतीने यायला हरकत नाही. लेखिकेचे विवेचन काही ठिकाणी विवाद्य वाटत असले तरी डाकूगिरीच्या समस्येवर प्रकाश टाकण्याच्या दृष्टीने पुस्तक उपयुक्त आहे. आणि लेखिकेचे परिश्रमही प्रशंसनीय वाटतात. चंबळ खोऱ्यातील डाकूगिरीचे स्वरूप लेखिकेने मांडले आहे ते असे :--

चंबळच्या दस्यूभूमीचा प्रदेश हा यमुनेच्या खोऱ्यातील चंबळ आणि कुयरी या दोन नद्यांच्या दुआबातील ५०-६० मैलांचा आणि २५०० चौ. मैलांचा आहे. वर्षानुवर्षे नदीच्या प्रवाहाने आणि पावसाने धुपलेला, ओहोळ ( बेहड ), टेकड्या आणि जंगले यांनी व्याप्त, दुर्गम आणि दळवळणाची पुरेशी साधने नसलेला, पावसाचे प्रमाण कमी असून पाटबंधारे फारसे नसलेला, इतर भारताच्या मानाने मागासलेला अविकसित असा हा प्रदेश आहे. या प्रदेशात व्यापारी पिके कुठलीच नाहीत. तेथे मोठे उद्योगधंदे नाहीत आणि रोज मजुरीसाठी बाहेर जाणारांचे प्रमाणही अल्प आहे. त्यामुळे तेथे दारिद्र्याने ठाण मांडले आहे. तेथील ओहोळ कित्येक मैल पसरलेले असून चंबळेच्या शेवटच्या ५०-६० मैलांच्या बेहडाच्या प्रदेशात डाकूगिरीचे थैमान चालू आहे. पूर्वीची जुनी संस्थाने आणि सध्याचे मध्यप्रदेश, राजस्थान आणि उत्तर प्रदेश यांच्या दरम्यानचा भूभाग हा डाकूंच्या हालचालींचा प्रदेश आहे. वेळीप्रसंगी डाकूंचा वावर भारत-पाकिस्तान सीमा ओलांडून पलीकडेही होतो. या प्रदेशातील सामाजिक परिस्थितीचेही पर्यालोचन लेखिकेने केले आहे. तेथे ब्राह्मण, ठाकूर आणि चांभार या तीन प्रमुख जाती असून चांभारांचे प्रमाण सगळ्यात अधिक म्हणजे ३४·५ टक्के आहे आणि ब्राह्मण आणि ठाकूर या दोहोंचे मिळून प्रमाण २८ टक्के आहे. तेथील चांभारवर्ग हा काममू असून चांगल्या प्रकारे शेतीभाती करणारा सुस्थितीत असलेला असा वर्ग आहे. ब्राह्मण आणि ठाकूर हे पूर्वापार सरंजामीवर्गाचे असून स्वतंत्र भारतातील नव्या कायद्यामुळे शूद्र आणि अस्पृश्य जातींना जे स्वातंत्र्य आणि हक्क मिळाले आहेत त्यांना विरोध करणारे प्रतिगामी वृत्तीचे आहेत. विशेषतः अस्पृश्यांना मिळालेले स्वातंत्र्य त्यांना मान्य नाही. एकंदर शिक्षणाचे प्रमाण कमी. त्यातही स्त्रियांच्या शिक्षणाचे प्रमाण अतिशयच कमी. एकूण लोकसंख्येत पुरुष आणि स्त्री यांचे प्रमाण ३४·२९ इतके विषम आहे.

लेखिकेने म्हटल्याप्रमाणे डाकूंना सामाजिक प्रतिष्ठा लाभल्यामुळे या समस्येचे स्वरूप भयानक झाले आहे. चंबळ खोऱ्यातील डाकू हे प्रामुख्याने ब्राह्मण आणि ठाकूर या वर्गातून आले आहेत. त्यांना जमीनदारांचा पाठिंबा आहे. डाकूंच्या टोळ्या असून त्या युनिफॉर्ममध्येही असतात. या टोळ्या बेहडांच्या निर्जन आणि जंगली प्रदेशांचा आश्रय घेतात आणि शूद्र आणि अस्पृश्य जातींच्या साहाय्याने गावाशी संबंध ठेवतात. काही प्रमाणात या टोळ्यांना राजकीय प्रतिष्ठाही लाभते. १९४२ च्या आंदोलनात भूमिगत चळवळ्ये त्यांचा आश्रय घेत.

निवडणुकीत राजकीय पक्ष त्यांचे साहाय्यही घेतात. मानसिंग, लखनसिंगसारखे डाकू सुखवस्तू घराण्यातील तस्कर व्यापारी होते. या डाकूंना जनतेची सहानुभूतीच नव्हे तर कौतुकही लाभलेले आहे. ते क्रूर आहेत पण ते माणसातून उठलेले नाहीत. आणि त्यांच्या मनाला विकृती जडलेली नाही असे लेखिकेचे म्हणणे आहे. डाकूंच्या मागे समाजातील एक मोठा वर्ग उभा आहे. डाकूगिरीमुळे त्या वर्गाचा आर्थिक लाभ मोठ्या प्रमाणावर होतो. म्हणून ' गुन्हेगारी लाभदायक ठरते '

या डाकूंना स्वतंत्र भारताबद्दल कसलीही सहानुभूती नाही; त्यांच्यात राष्ट्रीय वृत्ती नाही. स्वतःच्या भवितव्या-बद्दल त्यांना कुठली आशा नाही. ते ध्येयहीन असतात, जनतेचे कल्याण त्यांना अभीष्ट नसते. त्यांच्या उपद्रवापात राजकारण नसते. त्यांच्यात आपसांत एकी नसते. ते मद्य, मदिराक्षी आणि द्यूत यांचे भोक्ते असतात. असे डाकूंचे चित्र लेखिकेने उभे केले आहे. हे डाकू कसे बनले याची कारणेही तिने दिली आहेत. प्रख्यात डाकू मानसिंग तल्फीरामाच्या वैमनस्यामुळे डाकू झाला. मेवाराम हा घनश्याम चौबेचा खून करून बेहडात मानसिंगाच्या आश्र-याला गेला. लखनसिंग हा प्रतिस्पर्धी ठाकूर कुटुंबाशी मत-भेद झाल्यामुळे डाकू बनला. मूळची नर्तिका पुतळी हिला जाळ्यात ओढून तिच्या इच्छेविरुद्ध तिच्याकरवी खून करवून तिला डाकूगिरीत सामील होण्याला भाग पाडले. थोडक्यात म्हणजे डाकू बनण्याची जी कारणे लेखिकेने दिली आहेत ती वैमनस्य, कौटुंबिक हेवेदावे, सूडबुद्धी, प्रेमप्रकरण ही आहेत.

डाकू आणि डाकूगिरी यांचे लेखिकेने केलेले हे वर्णन पाहिल्यानंतर डाकूगिरीची कारणमीमांसा करताना लेखि-केने केलेली निदाने आणि निष्कर्ष विसंगत वाटतात. डाकूंची समस्या ही कायदा आणि सुव्यवस्थेची मानली गेली, पण ती सामाजिक आणि नैतिक स्वरूपाची मानली गेली नाही हे लेखिकेचे म्हणणे खरे असले तरी त्या समस्येचा जो अन्वयार्थ लेखिकेने लावण्याचा प्रयत्न केला आहे तो पटण्यासारखा नाही. तो अन्वयार्थ लावताना लेखिकेचा गोंधळ उडाला आहे असे वाटल्यावाचून राहात नाही. हे पुस्तक वाचून संपल्यानंतर लेखिकेने डाकूंच्या समस्येवर भलतेचे निष्कर्ष आरोपिले आहेत, असा समज झाल्या-शिवाय राहात नाही. या समस्येचा उलगडा तिने क्रांती-प्रती क्रांतीच्या संदर्भात करण्याचा प्रयत्न केला आहे. तिची पुढील विधानेच याची साक्ष देतात "चंबळच्या ओहोळातील दंगल ही सरंजामशाहीने नव्या युगाला दिलेली धडक आहे." "अनियंत्रित सत्तेच्या जुलमाविरुद्ध रजपूतांची होणारी प्रतिक्रिया मुलुखगिरीचे किंवा बंडाळीचे रूप घेत होती." "डाकूंच्या शक्तीचे स्रोत सामाजिक प्रतिक्रांतीत आहेत." "चंबळ घाटीच्या रणभूमीवर विकसित भारतीय समाज आणि चंबळ घाटीचे मध्ययुगीन युद्धप्रिय रजपूत यांचा संग्राम चालू आहे." "सवर्ण हिंदूंची आजवरची मिरासदारी राखण्यासाठी केलेली ती बंडखोरी आहे." "ती प्रतिक्रांतीची झुंज आहे." या प्रकारच्या अनेक विधानावरून वाटते की क्रांतीप्रतिक्रांतीच्या चौकटीत दस्यूसमस्या बसविण्याचा लेखिकेचा अट्टाहास चालू आहे. किंबहुना असेही म्हणता येईल की, क्रांतिप्रतिक्रांतीचा संदर्भ पूर्वग्रहीत धरूनच लेखिकेने त्या समस्येचा अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. लेखिकेनेच दस्यू आणि दस्यूभूमी यांचे जे दर्शन घडविले आहे त्यावरूनच तिची वर दिलेली सर्व विधाने अतिरंजित आणि अतिव्याप्त वाटतात. दस्यू-समस्येशी अवास्तव प्रश्नांची गल्लत केल्यामुळे आणि क्रांति-प्रतिक्रांती, बंडाळी, मुलुखगिरी अशाप्रकारचे अर्थ काढण्याचा प्रयत्न केल्यामुळे दोष विषयाचा आहे असे म्हणण्याची पाळी तिच्यावर आली आहे. त्यामुळे लेखिकेचेही समाधान झाले नाही हे प्रारंभीच्या तिच्या निवेदना'वरून दिसून येते.

डाकूगिरीच्या समस्येला असा चुकीचा दृष्टिकोण लावल्यामुळे "सामाजिक परिस्थिती व ऐतिहासिक परंपरा ह्यांच्यात दृढमूल झालेली ही समस्या कितीही शक्ती लावली तरी सुटण्याजोगी नाही," असे लेखिकेला वाटते. दस्यूसमस्या 'अजरामर' आहे असे लेखिका गृहीत धरून चालते. म्हणून तिला असे म्हणावे लागले आहे की, "मध्यप्रदेशाने दस्यूसमस्येविरुद्ध केवढेही भगीरथ प्रयत्न केले तरी ती नामशेष होणार नाही" आचार्य विनोबा भावे यांची पदयात्रा सामाजिक क्रांतीच्या संदर्भात फुकट गेली असे लेखिकेने म्हटले आहे तेही याच दृष्टिकोणामुळे. तसेच मुलुखगिरी आणि डाकूगिरी ही ती समान मानते तेही त्यामुळेच. डाकूगिरीच्या संदर्भात दौलतराव शिंद्यांच्या वेळचे राघोगडच्या जयसिंगाचे जे उदाहरण लेखिकेने दिले ते गैरलागू आणि अप्रस्तुत वाटते. जयसिंग झगडत होता ते आपली गेलेली सत्ता परत मिळविण्यासाठी. असे झगडे इतिहास काळात सर्वत्र चालत असत. त्याला डाकूगिरीत समाविष्ट करणे म्हणजे इतिहासाचा चुकीचा अर्थ लावणे होय.

चंबळखोऱ्यातील डाकूगिरीची कारणमीमांसा शोधावी म्हणून लेखिकेने 'इतिहासाचा मागोवा' घेतला आहे. वेदकालापासून भारताचा सारा इतिहास या प्रकरणात तिने धुंडाळला आहे. पण एवढा सारा इतिहास धुंडाळूनही तिला या डाकूगिरीवर प्रकाश टाकता आला नाही किंवा तिची नेमकी कारणेही दाखविता आली नाहीत. त्यामुळे

तिने घेतलेला इतिहासाचा मागोवा उथळच नव्हे तर अनावश्यक ठरला आहे. दस्यूगिरी ही भारताची ऐतिहासिक परंपरा आहे. " मागील कित्येक शतकांचा वारसा आहे, " हा लेखिकेचा निष्कर्ष पटण्यासारखा नाही.

लेखिकेच्या विचारातील गोंधळामुळे काही ठिकाणी विसंगतीही निर्माण झाली आहे. वर सांगितल्याप्रमाणे दस्यूगिरी नाहीशी होणार नाही, अशी विधाने तिने केली आहेत तर दुसऱ्या एके ठिकाणी ती म्हणते " या मागासलेल्या भागात दळणवळणाची साधने, पाटबंधारे व इतर सोयी वाढल्यास तेथील सुबत्ता वाढून दस्यूवृत्ती कमी होण्याचा संभव आहे " तसेच आणखी एके ठिकाणी ती म्हणते " उद्योगीकरणाच्या वाटचालीत समाजाची नवी घडी बसेल, त्यात ही प्रतिक्रांतीची ठिणगी आपोआप विझून जाईल. " पुनर्रचनेसारख्या योजना दस्यूसमस्येवर उपकारक परिणाम करतील असे तिला वाटत नाही. तिच्या मते या " योजना दस्यूसमस्या निरपेक्ष आहेत इतकेच नव्हे तर या दोन्ही समस्यांची पातळी संपूर्णतः निराळी आहे. " त्याप्रमाणेच एकदा ती असे म्हणते की डाकूंचे " राज्यसत्तेशी मूलभूत मतभेद नव्हते ". पण पुढे तिला असे वाटते की, डाकूंचे स्वप्न " त्यांना जाचक वाटणारी सत्ता नष्ट करण्याचे मात्र आहे ". हृदय परिवर्तनाच्या बाबतीतही अशीच परस्परविरोधी विधाने करण्यात आली आहेत. हृदयपरिवर्तनावर लेखिकेचा विश्वास नाही, त्याला ती थोतांड म्हणते. आचार्य विनोबा भावे यांचा ' प्रेम अभियानाचा प्रयोग ' फसला, आचार्यांचा पराभव झाला असे तिने सांगितले आहे. पण पान १४५ वर तिने सामूहिक हृदयपरिवर्तनाचे जे विवेचन केले आहे त्यावरून अशा हृदयपरिवर्तनाला अवसर असतो असा अभिप्राय व्यक्त केला आहे.

आचार्य भावे यांच्या प्रयोगाचा आढावा घेताना लेखिकेने आचार्यांवर अन्याय केला आहे असे म्हटल्यावाचून राहावत नाही. आचार्यांना या दस्यूसमस्येचे यथार्थ आकलन झाले नाही असे तिचे मत आहे. हे मत बरोबर आहे असे म्हणता येत नाही. ही समस्या नैतिक मानली नाही अशी लेखिकेने तक्रार केली आहे. पण आचार्यांनी ही समस्या नैतिक मानली. ' डाकू नव्हे तर डाकूगिरीची वृत्ती नष्ट केली पाहिजे. ' हे आचार्यांचे निदान चुकीचे म्हणता येईल काय? आचार्यांचा मार्ग अर्थात हृदयपरिवर्तनाचा होता. पण हृदयपरिवर्तनाने डाकूगिरी नष्ट होणार नाही असे गृहीत धरल्यामुळे लेखिकेला आचार्यांच्या प्रयोगाचे यथार्थ मूल्यमापन करता आले नाही. आचार्यांचा प्रयत्न अगदीच अयशस्वी झाला असे म्हणता येत नाही. आचार्यांना काही प्रमाणात यश आले होते. पण लेखिकेच्या सांगण्यावरूनच त्यांचा प्रयोग यशस्वी होण्याला जशी अनुकूलता हवी होती तशी ती लाभली नाही; शासनयंत्रणेचे विशेषतः पोलिस खात्याचे हवे तसे सहकार्य त्यांना मिळाले नाही. तसेच आचार्यांना पुरेसा अवधीही मिळाला नाही; आणि त्यांच्या प्रयोगात सातत्य राहिले नाही. डाकूंच्या आत्मसमर्पणानंतर ' प्रेम अभियाना 'ची जी आनुषंगिक कार्यवाही व्हावयाला हवी होती तशी झाली नाही. अशा परिस्थितीत आचार्यांचा प्रयोग फसला आणि त्यांना पराभव पतकरावा लागला असे म्हणणे कितपत योग्य होईल? लेखिकेने आपले निष्कर्ष आचार्यांना ऐकविले. पण त्यांच्या प्रतिक्रिया काय झाल्या हे मात्र सांगितले नाही. हृदयपरिवर्तन हा दरवडेखोरीवर तोडगा होऊ शकतो याला अलीकडच्या इतिहासात दाखले सापडतात. चिदंबर दीक्षित आणि कैकाडीबुवा यांचे हृदयपरिवर्तनाचे प्रयत्न सफल झाले आहेत. बेळगाव-धारवाड जिल्ह्यांच्या सीमेवर दरवडेखोरीने जीवन जगणाऱ्या बेरड समाजाला डाकूगिरीपासून निवृत्त करण्यात चिदंबर दीक्षितांनी गुर्लहोसूर भागात यश मिळविले होते. तसेच सोलापूर जिल्ह्यात गुन्हेगारी वृत्तीच्या कैकाडी समाजाला सन्मार्गाला लावण्यात कैकाडीबुवांचे प्रयत्न सफल झाले आहेत.

लेखिकेने दस्यूभूमीचे घडविलेले दर्शन अपुरे वाटते. ब्राह्मण, ठाकूर आणि चांभार या जातींचे प्रमाण शेकडा जवळजवळ ६३ इतके आहे. बाकीचे ३७ टक्के कोण आहेत हे लेखिकेने दिले नाही. त्यांत बनिया आणि सोनार यांचा वर्ग आहे आणि त्यांच्यावर डाके घालण्यावरच डाकूंचा रोख असतो या वस्तुस्थितीचा उल्लेख या पुस्तकात आला नाही. तेथील समाजात अद्याप ब्राह्मणांना फार मान आहे. तसेच ठाकूर ( रजपूत ) हे मूळचे जमीनमालक. पण पिढ्यान्‌पिढ्या त्यांच्या जमिनीत विभागण्या होत गेल्यामुळे शेवटी प्रत्येक ठाकूर घराण्याच्या वाट्याला अगदीच तुटपुंजी जमीन येऊ लागली, त्यात कुटुंबाचा चरितार्थ चालविणे अशक्य होऊ लागले. दुसरे चरितार्थाचे साधन नसल्यामुळे काही साहसी वृत्तीचे ठाकूर डाकूगिरीकडे वळले. यात डाकूगिरीच्या समस्येचा उगम आहे असे त्या भागातील जाणत्या मंडळींचे म्हणणे आहे. विशेषतः ही

परिस्थिती भिंड आणि मोरेना या जिल्ह्यांत अधिक ठळक-पणे दिसून येते. ' परिश्रमाचे फळ उपभोगण्याच्या मूलभूत अधिकाराला येथे आव्हान मिळाले आहे ' हे लेखिकेचे म्हणणे यथार्थ आहे. पण तेथल्या विशिष्ट परिस्थितीत परिश्रमाचे फळ उपभोगण्याला मर्यादा पडतात आणि त्यातून डाकूगिरी उद्‌भवते हे विसरून चालणार नाही. तसेच चंबळ खोऱ्यातील पोलिस आणि मुखबीर हे दोन्ही प्रामुख्याने ठाकूर आहेत आणि डाकू हे डाणोंचा ( शेत-शिवारातील वाड्यांचा ) नेहमी आश्रय घेत असतात. त्यामुळे डाकूंचा प्रतिकार जसा व्हावा तसा होत नाही या गोष्टीकडे लेखिकेचे दुर्लक्ष झालेले दिसते. या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे दस्यूभूमीचे सम्यक दर्शन या पुस्त-कात घडत नाही असे म्हणावे लागते.

डाकूगिरी ही मुलतः गुन्हेगारी आहे या गोष्टीकडे लेखिकेने द्यावे तितके लक्ष दिले नाही. डाकूंच्या करामती-मुळे आणि त्यांच्या कर्तृत्वाला बंडाळी आणि क्रांतिप्रति-क्रांतीचा संदर्भ जोडल्यामुळे खुद्द लेखिका त्यांच्याकडे आदरमिश्रित कौतुकाने पाहते असे वाटल्याशिवाय राहात नाही. गुन्हेगारी हा मानसिक प्रश्न आहे आणि चंबळ खोऱ्यातील डाकूगिरीला सामाजिक प्रतिष्ठा लाभली आहे. या दृष्टीने ही समस्या नैतिक आणि सामाजिक आहे. माधव-राव शिंद्यांनी डाकूंच्या बाबतीत कणखर धोरण पतकरल्या-मुळे डाकूगिरीला आळा घालण्याच्या दृष्टीने त्यांचे प्रयत्न यशस्वी होण्याच्या मार्गावर होते. पण लेखिकेने म्हटल्या-प्रमाणे शिंद्यांच्या अकाली मृत्यूमुळे त्या प्रयत्नात सातत्य राहिले नाही. शिंद्यांचे धोरण पुढे चालविणारा कणखर शासकही निर्माण झाला नाही. शिंद्यांजवळ सामाजिक दृष्टिकोण नव्हता. दलाच्या जोरावरच ते डाकूगिरी दडपू पाहात होते.

लेखिकेने डाकूगिरीचे जे वर्णन केले आहे त्यावरून एक गोष्ट स्पष्ट दिसून येते की ज्या ज्या वेळी शासनयंत्रणेत ढिलाई होत असे त्या त्या वेळी डाकूगिरी डोके वर काढीत होती. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात, १९४७ साली भारत स्वतंत्र झाल्यानंतर उत्तरेकडे जी अस्थिर परिस्थिती निर्माण झाली त्या वेळी, संस्थानांचे विलीनीकरण होऊन नवीन मध्यभारत निर्माण झाला. त्या वेळी, १९५६ साली राज्य-पुनर्रचना होऊन विविध प्रदेशांचे कडबोळे असा नवा मध्य-प्रदेश निर्माण झाला त्या वेळी आणि चीनचे आक्रमण झाले त्या वेळी डाकूगिरीने उचल खाल्लेली दिसते. या सर्व प्रसंगी शासनयंत्रणा इतर व्यापात व्यग्र झाल्यामुळे डाकूगिरीकडे त्यांचे दुर्लक्ष होत असे. त्यामुळे डाकू बिनधोकपणे आपले उपद्र्याप चालवू शकत असत. चंबळ खोऱ्याच्या नेतृत्वात लेखिकेने म्हटल्याप्रमाणे सामाजिक जाणिवेचा जसा अभाव होता, त्याप्रमाणेच सरकारच्या प्रयत्नांत एकसूत्रीपणाचा अभाव होता. डाकूगिरीने व्यापलेल्या सगळ्या प्रदेशात एकसूत्री अशी एकच पोलिसी यंत्रणा सरकारने उभी केली नाही. त्याचा फायदा डाकूंना मिळाल्याखेरीज राहिला नाही. पहिल्या महायुद्धाच्या काळात आणि त्यानंतर बेळगाव, धारवाड, विजापूर या जिल्ह्यांच्या दरम्यान डोंगरी प्रदेशात बेरडांनी असाच धुमाकूळ घातला होता. पण शासनयंत्रणेने व्यवस्थित प्रयत्नांनी तो काबूत आणला. मुंबई इलाख्यातील एके काळी गुन्हेगार मानण्यात आलेल्या जमातींविषयीचे सरकारी रिपोर्ट लेखिकेने वाचले असते तर डाकूगिरीचे विशेष समजण्याला ते साहाय्यभूत झाले असते.

असे काही दोष सोडल्यास हे पुस्तक एकंदरीत वाचनीय आहे. ग्रंथाचा विषय निवडण्यात लेखिकेने अभिनवता दाखविली आहे. अशा विषयांचा विवेचक अभ्यास जनते-समोर येणे आवश्यक आहे. लेखिकेची शैली प्रसन्न असून भाषा ओघवती आहे. त्यामुळे वाचकाला विषयाचे आक-लन सुलभ रीतीने होते. लेखकेचे काही निष्कर्ष विवाद्य असतील, पण तिचे परिश्रम कौतुकास्पद आहेत. पुस्तक वाचून हातावेगळे करताना समाधान आणि असमाधान यांच्या संमिश्र भावना निर्माण होतात. विषय हाताळण्याची हातोटी पाहून समाधान वाटते आणि दस्यूसमस्येचा नीटसा उलगडा झाला नाही म्हणून काहीशी रुखरुख राहते. शेवटी प्रश्न उभा राहतो की दोष विषयाचा आहे की लेखिकेचा आहे ?

—वा. रं. सुंठणकर

• •

सारसंकलन

# भोपाळच्या संमेलनापुढील कार्य*

मराठी साहित्यसंमेलनाचे या वर्षातील अधिवेशन महाराष्ट्रातील अग्रगण्य संशोधक आणि ग्रंथकार, नागपूर विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. वि. भि. कोलते यांच्या अध्यक्षतेखाली मे महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यात भोपाळ येथे भरणार आहे. भोपाळ ही मध्यप्रदेशाची राजधानी. त्यामुळे विदर्भातील सौंसर, पांढुर्णा, मुलताई, बऱ्हाणपूर, भैसदेही, वाराशिवनी इत्यादी जे मराठीभाषी भाग मध्यप्रदेशात अन्यायाने घातले गेलेले आहेत, त्यांचा प्रश्न या अधिवेशनात धसाला लावण्यात यावा, असे जर मराठी भाषेच्या अभिमान्यांना वाटले, तर ते स्वाभाविकच म्हणावे लागेल. पण आता महाराष्ट्राचे स्वायत्त राज्य अस्तित्वात आलेले असल्यामुळे, सीमा भागाचे विवाद्य प्रश्न काय किंवा महाराष्ट्राच्या शेजारील राज्यात स्थायिक झालेल्या हजारो मराठी भाषिकांच्या हितसंबंधांचे प्रश्न काय, हे सर्व यापुढे महाराष्ट्र सरकारवरच संमेलनाने सोपविले पाहिजेत, व त्या सरकारनेही सरकारी पातळीवरून त्या प्रश्नांचा न्याय्य निर्णय लावून घेतला पाहिजे. हे आता सरकारचे कर्तव्य आहे; साहित्यसंमेलनाचे नाही. महाराष्ट्र राज्य निर्मितीच्या प्रश्नाकडे जोपर्यंत महाराष्ट्रातील राजकीय पक्षांचे नेते दुर्लक्ष करीत होते, तोपर्यंत मराठी साहित्यसंमेलनाला तो प्रश्न हाती घेऊन त्या नेत्यांना कार्यप्रवृत्त करणे प्राप्त होते; व त्या दृष्टीने १९४६ पासून तो १९५५ पर्यंत संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर मराठी साहित्यसंमेलनाने जो भर दिला होता, तो सर्वथैव योग्य होता. पण आता महाराष्ट्र सरकार स्थापन झालेले असल्यामुळे साहित्यसंमेलनाला मराठी भाषिकांच्या प्रश्नांसाठी चळवळ करण्याचे कारण नाही. फक्त त्याने ठराव करून महाराष्ट्र सरकारला वेळोवेळी गरजेप्रमाणे, जागृत आणि सावध करावे एवढेच! तेवढी कामगिरी भोपाळच्या संमेलनाने केली, म्हणजे पुरे आहे.

आता संमेलनापुढे सर्वांत महत्त्वाचे कार्य जर कोणते असेल, तर ते म्हणजे मराठी भाषेचे संशोधन, अध्ययन, अध्यापन आणि ग्रंथलेखन यांच्याकडे बारकाईने लक्ष पुरवून, आज मराठी वाङ्मयात किंवा महाराष्ट्रातील विद्यापीठातल्या मराठीच्या अभ्यासक्रमात जी अनेक वैगुण्ये आणि उणिवा आहेत, ती दूर करण्यासाठी सतत अगत्याने झटणे हे होय. त्या दृष्टीने, डॉ. कोलते यांची निवड या संमेलनाच्या अध्यक्षपदावर झाली, हा योगायोग उपकारक ठरेल. महाराष्ट्रात असा एक समज रूढ झालेला आहे की, जो ललित साहित्य निर्माण करतो, तोच फक्त साहित्यिक; व त्यालाच फक्त संमेलनाचे अध्यक्षपद देण्यात यावे.

... या चुकीच्या समजुतीमुळे साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद हे ललित लेखकांना देण्याकडेच अधिक प्रवृत्ती आहे. इतकी की, राजवाडे, खरे, सरदेसाई, शेजवलकर, दाते, जोगळेकर यांच्यासारख्या मराठी वाङ्मयात मौलिक स्वरूपाची विविध भर घालणाऱ्या आणि त्याच्या अनेक उपेक्षित शाखा समृद्ध करणाऱ्या श्रेष्ठ संशोधकांना आणि ग्रंथकारांना मराठी साहित्यातील हा अत्युच्च बहुमान काही मिळू शकला नाही. यापुढे तरी मराठी महामंडळाचे नेते आणि कार्यकर्ते अशा प्रकारचा अन्याय मराठी भाषेच्या थोर सेवकांना होऊ देणार नाहीत अशी आशा आपण करू या.

डॉ. कोलते यांच्यासारखा मराठी भाषेच्या संशोधनात, अध्ययनात, अध्यापनात आणि तद्विषयक प्रश्नांच्या चिंतनात आयुष्य घालविलेला अनुभविक बहुश्रुत विद्वान भोपाळच्या संमेलनाला अध्यक्ष लाभलेला असल्यामुळे, मराठी वाङ्मयाच्या ज्या अनेक शाखोपशाखा आज उपेक्षित किंवा अविकसित अवस्थेत आहेत, त्यांचे संवर्धन करण्याच्या बाबतीत डॉक्टरसाहेबांचे भाषण, संमेलने आणि विद्यापीठे या दोहोंनाही मार्गदर्शक व्हावे, अशी अपेक्षा आहे. आमच्या विद्यापीठात आज ज्ञानोपासनेपेक्षा राजकारणाला अधिक प्राधान्य मिळालेले असून अध्यापक-

* साप्ताहिक तरुण भारत, नागपूर ता. २-४-६७ च्या अग्रलेखातून किंचित संक्षिप्त स्वरूपात साभार उद्धृत.

—संपादक-म. सा. पत्रिका.





अनुक्रमणिका

वर्ग आणि त्याहीपेक्षा विद्यार्थिवर्ग राजकीय उचापतीत जास्त रस घेताना आढळतो. पारतंत्र्याच्या काळात ही प्रवृत्ती इष्ट ठरल्यासारखी होती. पण, आता देश स्वतंत्र झालेला असल्यामुळे, विद्यापीठे, त्यांचा अध्यापकवर्ग आणि विद्यार्थिवर्ग यांचे जर आज कोणते एकमेव परम कर्तव्य असेल, तर ते हे आहे की, ज्ञानविज्ञानाच्या ज्या प्रगतिपोषक शाखा पारतंत्र्याच्या काळात आमच्या विद्यापीठांना प्रवर्तित किंवा समृद्ध करता आल्या नाहीत त्या सर्व शाखा संपन्न करून आपल्या मागासलेल्या देशाला वैचारिक आणि भौतिक प्रगतीच्या आघाडीला आणून उभे करणे. पण दुर्दैवाने ही जाणीव विद्यापीठाचे प्रमुख, अध्यापकवर्ग आणि विद्यार्थिवर्ग यांना नाही.

... याचा परिणाम असा झालेला आहे को, ज्ञानविज्ञानाचे अणुसंशोधनासारखे विषय जरी साहित्य–संमेलनाच्या क्षेत्रात येत नाहीत म्हणून बाजूला केले, तरी मराठी भाषा व तिच्या प्रादेशिक आणि जातीय बोली मराठी भाषेचे यादवकालीन, बहामनीकालीन, शिवकालीन आणि पेशवेकालीन स्वरूप, फारसी, उर्दू, कानडी, तामीळ, गुजराती, हिंदी वगैरे भाषांचा मराठीवर झालेला परिणाम, मराठीच्या व्याकरणाची गेल्या दीडशे दर्षांतील परिवर्तनाच्या दृष्टीने प्रगती, मराठीतील कोशरचना इत्यादी मराठी भाषा आणि साहित्य यांच्या विकासाच्या दृष्टीने महत्त्वाच्या असलेल्या विषयांकडे काही आमची संमेलने आणि विद्यापीठे यांचे म्हणण्याजोगे लक्ष अद्याप गेलेले नाही. साहित्याच्या व्यासपीठावरून भरीव अशी उद्बोधक चर्चा जर त्यातल्या त्यात कोणत्या विषयाची झाली असेल तर ती फक्त साहित्यशास्त्रातील प्रमेये आणि साहित्यविषयक उपपत्ती यांची ! त्याव्यतिरिक्त, भारताचार्य श्री. चिंतामणराव वैद्य आणि प्रो. कृ. पां. कुळकर्णी यांचा एखाददुसरा अपवाद सोडल्यास कोणत्याही भाषाशास्त्रीय प्रश्नाचा ऊहापोह संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणातून झालेला बहुधा आढळणार नाही. कै विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी मराठी भाषेचे पाणिनी म्हणून ज्यांचा यथार्थ गौरव केलेला आहे, ते रा. ब. दादोबा पांडुरंग आणि त्यांच्यानंतर सत्तर वर्षांनी व्याकरणावर तितकीच मौलिक ग्रंथरचना करणारे श्री. मोरो केशव दामले हे दोन वैयाकरण सोडले, तर त्यानंतरच्या गेल्या साठ वर्षांच्या काळात मराठी भाषेत झालेल्या अनेक परिवर्तनांचे संशोधन आणि विश्लेषण करून, तिचे नवीन व्याकरण निर्माण करणारा त्यांच्या तोडीचा वैयाकरण अद्याप उत्पन्न व्हावयाचाच आहे. दादोबा आणि दामले यांच्या दरम्यानच्या काळात कृष्णशास्त्री चिपळूणकर, भांडारकर, रा. भि. गुंजीकर, राजारामशास्त्री भागवत, राजवाडे, गुणे, कृ. पां. कुळकर्णी प्रभृती लेखकांनी, संस्कृत आणि प्राकृत भाषा व ज्ञानेश्वरीसारखे प्राचीन ग्रंथ यांच्या अनुषंगाने जी व्याकरणादी भाषाशास्त्रीय प्रश्नांची चर्चा केली, त्या दर्जाची चर्चा करणारे वैयाकरण गेल्या चाळीस वर्षांत पुढे आलेले काही दिसत नाहीत. राजवाडे आणि कृ. पां. कुळकर्णी यांनी धातुकोश, नामादी शब्दव्युत्पत्तिकोश इत्यादी ग्रंथांची रचना करून व इतिहासाचार्यांनी तर महाराष्ट्रातील ग्रामनामे, कुलनामे उपनामे, वगैरेचे संशोधन करून महाराष्ट्राचा वसाहतकाल, मराठी भाषेचा उद्‌गम आणि विकास व मराठी भाषेतील स्थित्यंतरे यांच्यावर जो मौलिक प्रकाश पाडला तेवढाच ! नाही म्हणावयाला, डॉ. द. ह. अग्निहोत्री यांच्या ' मराठीचा वर्णोच्चार–विकास ' अशा एकाद्या ग्रंथाचा उल्लेख अपवाद म्हणूनच करावा लागेल.

मराठीच्या भाषाशास्त्राप्रमाणेच तिच्या बोलींच्या संशोधनाच्या बाबतीतही म्हणण्याजोगी प्रगती झालेली नाही. पुण्याच्या डेक्कन कॉलेजातील भाषाशास्त्राच्या व्यासंगाचे केंद्र आणि मुंबईचे मराठी संशोधन मंडळ यांच्या प्रेरणेने आणि प्रयत्नाने जी काय कामगिरी डॉ. सु. मं. कत्रे आणि प्रो. अ. का. प्रियोळकर यांच्या नेतृत्वाखाली झाली असेल तेवढीच. मराठीत प्रादेशिक आणि जातीय असे बोलींचे दोन प्रकार आहेत. म्हणजे असे की, नागपूर, वऱ्हाड, खानदेश, कोकण, गोवा इत्यादी महाराष्ट्राच्या त्या त्या भागातील बोली जशा भिन्न भिन्न आहेत त्याचप्रमाणे कुणबी, गुजर, कोष्टी, पवार, कोळी, महार इत्यादी जातींची बोलीही वेगवेगळी आहे. फार काय सांगावे ? कोकणात एका गावात राहणाऱ्या सारस्वत, कोकणस्थ आणि कऱ्हाडे या तीन ब्राह्मण जातीच्या बोलीतसुद्धा बराच फरक आढळतो. याशिवाय नागपूर, चांदा, भंडारा, यवतमाळ, अमरावती, नाशिक, ठाणे इत्यादी जिल्ह्यांत गोंड, कोरकू, कोलाम, वारली, भिल्ल, कातकरी, इत्यादी आदिवासी जमातींच्या ज्या निरनिराळ्या बोली आहेत, त्या निराळ्याच ! श्री. वर्दे, डॉ. सु. मं. कत्रे, डॉ. स. म. घाटगे, श्री. वा. ना. देशपांडे, डॉ. ना. गो. कालेलकर, प्रो. सुरेश डोळके, श्री. श्रीराम अत्तरदे, डॉ वि. बा. प्रभुदेसाई प्रभृती संशोधकांनी कोकणी, कुडाळी, वऱ्हाडी, नागपुरी, हळबी, अहिराणी इत्यादी

अनुक्रमणिका

